[redacted]ागरसाहित्य : : ८

# [redacted]जाचे तुषार

कथासंग्रह


लेखक

व्यंकटेश अनंत पै रायकर

गोमन्तक






बा. द. सातोस्कर, बी. ए.

मुंबई, फेब्रुवारी १९३९.

— माझे जिव्हाळ्याचे स्नेही

प्रो. रामचंद्र शं. नायक

व

डॉ. केशव म. भांडारे

यांस —

# प्रस्तावना



श्री. व्यंकटेश अ. पै रायकर यांच्या कथासंग्रहाला प्रस्तावना लिहितांना मला विशेष आनंद होत आहे. गोमंतकाची रमणीय यक्षभूमि प्रत्यक्ष पहाण्याचें भाग्य मला कांहीं अद्याप लाभलेलें नाहीं. पण, त्याचें सौंदर्य आणि कलाभिरुचि यांची अप्रत्यक्ष कल्पना ज्यांच्या ललित वाङ्मयावरून येते, त्या प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई, श्री. जयवंतराव सरदेसाई, कवि कारे, बोरकर, श्री. कंटक प्रभृति लेखकांच्या श्रेणींत श्री. रायकर यांची गणना, ते तारुण्याच्या उंबरठ्यावर उभे असतांनाही, होते, व म्हणून त्यांच्या या कथा-संग्रहाला प्रस्तावना लिहिण्याच्या निमित्तानें महाराष्ट्रापासून राज-कीय सत्ताभेदामुळें दुरावलेल्या गोमंतकाची सेवा करण्याची संधि मला मिळाली, याबद्दल मला आनंद वाटला.

प्रस्तुत संग्रह वाचतांना जर प्रथमच कोणती एक गोष्ट माझ्या लक्षांत आली असेल, तर ती ही कीं, श्री. रायकर यांच्या कथा-लेखनावर प्रो. सरदेसाई यांच्या लेखनशैलीची छाप बरीच पडली आहे. भाषेचें मार्दव, भावनांची मादकता आणि प्रणयचित्रांचें

गहिरें रंगभरण हे जे प्रो. सरदेसाई यांच्या शैलीचे लेखनविशेष, त्यांचा आढळ, अर्थातच सौम्य प्रमाणांत, प्रस्तुत संग्रहामध्यें होतो. **निसर्ग आणि नीति, हिरवा प्रकाश, भावनेचा बळी, वणव्यांतील फूल, व्यामोह, रवि आणि रजनी** वगैरे गोष्टी या दृष्टीनें वाचण्यासारख्या आहेत. त्या वाचीत असतांना मला एकच वैगुण्य वारंवार जाणवलें. तें असें कीं, अपवादात्मक अशी परिस्थिति दाखवून श्री. रायकर यांनीं लैंगिक जीवनाच्या कांहीं बाजू चित्रित केल्या आहेत. कदाचित् मोपासाँ किंवा स्टीफन झ्वाईग यांच्या व्यासंगाचाहि हा परिणाम असेल.

भाषा आणि भावना यांच्या लालित्याच्या दृष्टीनें श्री. रायकर यांच्या या कथा वरच्या दर्जाच्या असून, वेधक शब्दांनीं आणि तुटक वाक्यांनीं वाचकांच्या काळजाला हात घालण्याची हातोटीहि त्याना चांगली साधली आहे. **रवि आणि रजनी, वणव्यांतील फूल** व **व्यामोह** या रूपांतरित गोष्टी त्या दृष्टीनें जितक्या सुंदर आहेत, तितक्याच **निसर्ग आणि नीति, कुचंबणा, मुलासाठीं, हिरवा प्रकाश** वगैरे स्वतंत्र गोष्टीही सरस आहेत. **देवीचा कौल** ही गोष्ट मला प्रस्तुत संग्रहांत उत्कृष्ट वाटली. सांत पैचें त्यांतील शब्दचित्र जितकें सात्त्विक तितकेंच भावनोत्कट आहे. **ईश्वराचें अस्तित्व** ही गोष्टहि अशीच अतिशय हृदयंगम आहे; पण ती वाचल्यावर बॅल्झॅकच्या ख्रिस्ताच्या साक्षात्कारावरील अशाच प्रकारच्या गोष्टीची मला आठवण झाल्याविना राहिली नाहीं. **धर्माच्या नांवाखालीं** या गोष्टींतील ‘ शिष्यपापं गुरुस्थित: ’ या कल्पनेचा आविष्कार मार्मिक आहे. सारांश, प्रस्तुत संग्रहांत अशी गोष्ट एकहि नाहीं कीं, जिच्यांत कांहीं तरी गुणविशेष आढळणार नाहीं.

याचा अर्थ असा मात्र नाहीं कीं, श्री. रायकर यांना आतां कांहीं नवीन शिकण्यासारखें किंवा घेण्यासारखें उरलेलें नाहीं. त्यांच्या कथांतून जर अभाव असा कोणत्या गुणाचा असेल, तर तो मनो-

गाइनाचा; व हा गुण ललित प्रबंधांत नाहीं असें म्हणतांच बुद्धिमान् वाचकाचें त्याच्याविषयींचें कुतूहल किती कमी होतें, हें सांगावयाला नको. मानवी मनाला गुरफटून टाकणाऱ्या मृदुदुरंत भावनाकोशाचे पापुद्रे जसे श्री. रायकर यांना उलगडतां येत नाहींत, तशीच कथा-बीजाची निरनिराळ्या बाजूंनीं परिपोष करून दाखविणारी कल्पकताहि त्यांच्या ठिकाणीं अद्याप विकसित झाल्याचें दिसत नाहीं. मराठी कथालेखकांच्या सध्यांच्या रमण्यांत आपल्याला जर मानाचें स्थान मिळावें अशी त्यांची इच्छा असेल, तर त्यांनीं या दोन्ही बाबतींत प्रगति करणें अवश्य आहे.

प्रस्तावनेचा उद्देश वाचकांना लेखकाचा परिचय करून देणें हा जसा असतो, तशीच लेखकालाहि त्याच्या गुणावगुणांची ओळख करून देणें हा असावा, असें मला वाटतें. हें दुहेरी काम केल्यावर शेवटीं मी एवढेंच म्हणतों कीं, कलाभिरुचि आणि कथनकौशल्य हे दोन्ही गुण श्री. रायकर यांच्या ठिकाणीं असून त्यांचा हा कथासंग्रह मराठी वाचकवर्गांत त्यांच्या भावी लेखनाविषयीं निःस्संशय आशा आणि उत्कंठा उत्पन्न करील.

नागपूर
ता. १०।१।३९

अ. मा. भडारकर

# पुरस्कार



लघुकथा हातीं आली कीं हल्लींचा विद्वान वाचक किंवा परीक्षक महिल्यानें तंत्राच्या गोष्टी बोलूं लागतो. तंत्र ठराविक असलें तर कथेला वैचित्र्य येणार नाहीं. तंत्रें वेगवेगळीं नसलीं तर लेखकाचेंही महत्त्व रहाणार नाहीं. प्रश्न आहे तो तंत्राचा नव्हे. कथा सांगण्याच्या हातोटीचा किंवा विद्वानांच्या भाषेंत बोलायचें म्हणजे कथन-कौशल्याचा.

कथा सांगण्याच्या हातोटीच्या दृष्टीनें श्री. रायकर यांच्या कथांच्या तोडीच्या लघुकथा मराठींत फारच थोड्या आढळतील. विशेषतः शेवटची लोककथा **ईश्वराचें अस्तित्व** हिच्यासारख्या कथा फारच विरळ असतील. माझ्या लहानपणीं गोमंतकांत होडींतून प्रवास करीत असतांना ही लघुकथा ऐकल्याचें मला पक्कें स्मरतें. ईश्वराचें अस्तित्व प्रस्थापित करण्यासाठीं ही गोष्ट लिहिली आहे असा सकृद्दर्शनीं जरी भास झाला तरी या विशिष्ट तत्त्वाच्या चर्चेपेक्षां या प्रचलित लोककथेची बखर करून ठेवण्याचा लेखकाचा उद्देश मला फार आवडला. गोमंतकांत अशा पुष्कळ लोककथा आहेत. त्या संकलित करण्याचें

कार्य कुणीतरी केलें पाहिजे. **कुळागर** या कथासंग्रहांत अशाच कांहीं कथा आलेल्या आहेत. दैवी चमत्काराचा अंश जरी बाजूला ठेवला तरी या कथेचा वास्तविक धागादोरा बुद्धिप्रामाण्याला पटेल असा जुळवितां येईल. खवळलेल्या समुद्रांत तो शांत होण्यासाठीं तेल ओतलें जात. पोहण्याचा वेग वाढविण्यासाठीं पूर्वीच्या काळीं कोंकणचे दयावर्दी लोक अंगाला तेल चोपडीत असत. असाच कुणीतरी एखादा गाबीत किंवा भंडारी वादळांत सांपडलेली होडी घेऊन आला असावा अशी कल्पना केली तर त्या दैवी चमत्कारावर विरजण न पडतां तात्त्विक बुद्धीच्या माणसालाहि ती परिस्थिती सहज पटूं शकेल. त्याचप्रमाणें ज्या भावनेनें ही कथा सांगितली ती त्या वृद्ध गृहस्थाची आंतरिक भावना, त्या भावनेंतून निघणारे तोंडचे बोल, विशेषतः गोमंतकांत सहजसुलभ असलेलें कथनकौशल्य—जें प्रस्तुत लेखकाच्या लेखणींतही दिसून येतें—त्याचा परिणाम श्रोत्यांच्या मनावर झाला असा भास जर लेखकानें उत्पन्न केला, तर त्यांत कलेच्या दृष्टीनें कांहीं वावगें होणार नाहीं.

**देवीचा कौल** ही लोककथाही **ईश्वराचें अस्तित्व** गोष्टीप्रमाणेंच जितकी प्रादेशिक तितकीच प्रातिनिधिक आहे आणि तिच्याद्वारें उत्पन्न केलेला अलौकिकतेचा भास वरील गोष्टीप्रमाणेंच वास्तवतेशीं जास्त मिळता आहे.

भाषांतरित कथा वगळल्या तर बाकीच्या कथा सकृद्दर्शनीं प्रचारात्मक असाव्यात असें वाटतें; पण त्या प्रचारात्मक दिसूं नयेत याची खबरदारी घेण्यांत जें कौशल्य लेखकानें खर्ची घातलें आहे तें तितकेंच वाखाणण्यासारखें आहे.

**निसर्ग आणि नीति** व **भावनेचा बळी** या दोन गोष्टी जरी जुळ्या बहिणीसारख्या असल्या तरी एकाच प्रकारच्या परिस्थितींत पुरुष आणि स्त्री यांच्या मनोभावनेंत जो कठोरपणा व मार्दव दिसलें

पाहिजे तें ठळकपणें दाखविण्यांत लेखकाची सहृदयता स्पष्टपणें दिसून येते.

मुलासाठीं ही गोष्टही अशाच सामाजिक अन्यायाच्या पायीं घडलेल्या 'अनीती'ची निदर्शक आहे असें एखाद्या सनातनी वाचकाला वाटलें, तरी वात्सल्यासाठीं तळमळणाऱ्या स्त्रीचें अंतःकरण या कथेंत इतक्या उत्कटतेनें प्रतिबिंबित केलें आहे, कीं समदृष्टि वाचकाला ती वाचतांना अनीतीची कल्पनासुद्धां मनांत येणार नाहीं.

भाषांतरित कथांची निवडही फारच सुंदर झाली आहे. त्यामुळें पुर्तुगेज वाङ्मयांतील लघुकथेबद्दल मराठी वाचकांची जिज्ञासा वाढल्यावांचून रहाणार नाहीं.

या कथासंग्रहानें मराठी भाषेंतील कथा–वाङ्मयांत महत्त्वाची भर घातली आहे असें म्हणण्यास मला मुळींच दिक्कत वाटत नाहीं.

हाजी कासम वाडी, गिरगांव
मुंबई, ता. २१–१–३९.

भा. वि. वरेरकर.

तुझ्या सतत सान्निध्याचं स्वर्गीय सुख आणि तुझं पत्नीपद मला हक्कानं नसतं का मिळालं ?

विलासिनीच्या या भाषणानें मी चांगलाच चमकलों. ती आज असें कां बोलत आहे, याचा नीटसा उमज मला पडेना. मी प्रथम भांबावल्यासारखाच झालों. तथापि निर्विकार वृत्तीनें रुक्ष स्वरांत मीं म्हटलें,

— पण त्याचा आतां काय उपयोग आहे विलासिनी ? झालेल्या गोष्टी आतां बदलायच्या आहेत थोड्याच !

— असं म्हटल्यानंच माझी उणीव भरून येईल असं तुला वाटतं ना ? नशीब माझं ! मला मन नाहीं, विकार नाहींत अशी का तुझी समजूत आहे, रमेश ? इतर स्त्रियांप्रमाणेंच माझा हा हाडा-मांसाचा देह तारुण्यानं रसरसलेला आहे हें तुला पटवून द्यायला का हवं ?—इतकें बोलून, घट्ट धरून ठेवलेले माझ्या दोन्ही हाताचे पंजे तिनें आवेगभरांत आपल्या ओठाजवळ नेले, थोडा वेळ आपल्या छातीशीं दाबून धरले अन् माझ्या नजरेला नजर भिडवून तिनें म्हटलें,

— रमेश ! माझ्या आयुष्याच्या ह्या नाजूक बाबतींत तूं अशी उदासीनता, बेफिकिरी दाखवावी अं ? माझं सारं आयुष्य असंच एखाद्या जोगिणीप्रमाणें मी घालवावं ना ?

यावेळीं तिचा गौरवर्ण चेहरा संतापानें तांबडा लाल झाला होता; डोळ्यांत एक प्रकारची विलक्षण चमक मारत होती; ओंठ थरथरत होते; श्वास जोरानें वहात होता.

जरा थांबून ती पुढें म्हणाली,

—नाहीं, ही कुचंबणा आतां नाहीं सहन करवत माझ्यानं ! समोर दिसणारे खाण्याचे जिन्नस, सारं आयुष्यभर नुसते पहात राहून भूक भागविणं शक्य नाहीं मला आतां !

इतकें बोलून झटकन् तिनें मला पाण्यांतच घट्ट मिठी मारली व माझ्या छातीवर आपलें मस्तक टेंकून ती हुंदके देऊं लागली.

मला तिचें हें वर्तन पाहून कसेंसेंच वाटलें. माझें हृदय क्षणमात्र विचलित झालें. माझ्यांत पशुवृत्ति संचारूं लागली. आपणहून चालत आलेलें हें सुखाचें ताट झिडकारूं नये असें मला पहिल्या प्रथम वाटलें. पण दुसऱ्याच क्षणीं माझ्या प्रेमळ पत्नीची निष्पाप मूर्ति माझ्या डोळ्यांसमोर उभी राहिली, माझ्या उभ्या आयुष्याचा निष्कलंक इतिहास मला आठवला, विलासिनीवर असलेलें माझें बंधुवत् प्रेम आणि तिच्याबद्दल वाटणारी सहानुभूति माझ्या हृदयांत उसळ्या मारूं लागली आणि कांहीं झालें तरी माझा किंवा विलासिनीचा अधःपात होऊं द्यायचा नाहीं या उदात्त आणि उच्च हेतूनें मी गंभीर स्वरांत म्हटलें,

—विलासिनी! विलासिनी! काय हा अविचार? क्षणमात्र आलेलं हें मोहाचं पटल दूर सारून माझ्याकडे पहा! आपण विवाहित आहोत हें तूं विसरलीस वाटतं?. माझ्या पत्नीशीं, त्या भोळ्या भाबड्या निष्पाप जीवाशीं मी बेइमान होईन असं तुला वाटलं तरी कसं? ज्या क्षणिक सुखासाठीं तूं आपल्या अमल्य शीलाची राखरांगोळी करायला तयार झालीस तें सुख तुला इतकं का मोठं वाटलं? विलासिनी, क्षमा कर! माझं किंवा तुझं शील अपवित्र होईल असं वर्तन करणं मला कदापि शक्य नाहीं.

इतकें मी बोलत आहे तोंच अकस्मात् विलासिनी झट्कन् माझ्यापासन दूर झाली; तिनें आपला पदर सांवरला, मस्तक जोरानें हलवलें व गंभीर चेहरा करून म्हटलें,

—क्षमा असावी रमेश मला! माझी चूक झाली. माझी ही वृत्ति, माझं आत्तांचं वर्तन पाहून, एका कुलटेला आपलं भगिनीप्रेम अर्पण करण्यांत, तिच्याशीं अत्यंत आपलेपणानं अन् जिव्हाळ्यानं वागण्यांत आपण भयंकर चूक केली असं तुला वाटलं असेल, नाहीं

का ? पण आयुष्यांत कधीं कुणाला सांगितलं नाहीं तें माझं गुपीत मी तुलाच खुल्या दिलानं निवेदन केलं होतं. कुणा पुरुषाकडे जिनं अजून अभिलाषी वृत्तीनं पाहिलं नसतं त्या स्त्रीनं आज तुझ्याजवळच आपलं हळवं हृदय, आपली मानी वृत्ति, आपला देह अगदीं माती-मोल करून टाकला. विश्वस्त वृत्तीनं, फाजील आत्मविश्वासानं, निर्धास्तपणें पहिल्यान्दांच ज्याच्या गळयांत गळा मी घालूं गेलें, त्यानंच मला दूर लोटून देऊन माझ्या भावनांचा चुराडा केला; माझ्या हलक्या हृदयाचे तुकडे तुकडे करून टाकले. आतां...आतां चारही दिशा मला मोकळयाच आहेत, नाहीं का ? जगाकडे, समाजा-कडे पहाण्याची नवी दृष्टि तूं मला प्राप्त करून दिलीस, याबद्दल मी तुझे आभारच मानतें. ह्या क्षुद्र बेजबाबदार समाजाच्या बागुलबोवा-ची भीति माझ्या अंतःकरणांतून निघून गेली आहे आतां. सारं जग मला तुच्छ अगदीं कस्पटासमान दिसूं लागलं आहे. रमेश ! चल आतां आटपूंया आमचा स्नानविधी. तुझ्यासारख्या सच्छील, एकनिष्ठ प्रेमाचं व्रत कठोरपणानं पाळणाऱ्या विभूतीजवळ माझी अक्षम्य चूक झाली आहे. त्याची मला उदार अंतःकरणानं क्षमा करशील ना रमेश ?

मी गप्पच राहिलों. तिच्या धीरोदात्त चेहऱ्याकडे पहाण्याचें धाडस मला होईना. तिच्या मागोमाग अंग पुसायला मी वर आलों.



आणि वरील हकिकतीनंतर एका वर्षाच्या आंतच दोन हृदय-द्रावक वृत्तें आम्हांस कळलीं. तीं हीं, कीं विलासिनी एका शॉफरचा हात धरून मुंबईस पळून गेली व त्या धक्कयानें विहिरींत उडी टाकून रमाकाकूनें आपली जीवितयात्रा संपविली.

निसर्ग आणि नीति—सत्यकथा,
व्यं. अ. पै रायकर.

———

# भावनेचा बळी

अवघें वीस वर्षांचें वय ! आणि अशा अल्पवयांत कुसुमचा नाजूक देह क्षयाला बळी पडावा ना ?

...पण याला जबाबदार कोण ?...मीच नव्हे का ?



अगदीं लहानपणापासून कुसुमचा व माझा गाढ स्नेह. एकाच शाळेंत शिक्षण झालें आमचें ! आमचा गांव अगदींच खेडेंवजा असल्यामुळें सार्वजनिक शाळा तेथें नव्हतीच मुळीं ! माझ्या वडी-लांनीं मला शिकविण्यासाठीं मास्तर ठेवला होता. घरांतच आमची शाळा चाले व गांवचीं मुलेंहि पण तेथेंच शिकायला येत असत.

त्यावेळीं मी मराठी पांचवींत होतों अन् कुसुम तिसऱ्या इयत्तेंत होती. एके दिवशीं मास्तरांनीं नेमून दिलेला अभ्यास मजकडून मुळींच झाला नव्हता. मास्तरनीं कडक शब्दांत माझी हजेरी घेतली.

मी वर्गांत बसलेल्या कुसुमकडे नजर फेंकली. तिचे डोळे अश्रूंनीं डबडबलेले मला दिसले.

थोड्या वेळानें शाळा सुटली. मुलें बाहेर गेलीं. दप्तरांत पुस्तकें भरतां भरतां मी हळूच म्हटलें,

—कुसुम! मास्तर मला बोलले म्हणून तुला इतकं का वाईट वाटलं ?

—खरंच सांगतें मी तुला वसंत ! मास्तरांच्या प्रत्येक शब्दाबरोबर माझ्या हृदयाचे लचकेच तोडल्यासारखं मला वाटत होतं. तुला कुणीं टाकून बोललेलं नाहीं माझ्यानं ऐकवत !

मला गहिंवरून आलें. कुसूमच्या प्रेमळ हृदयाचें मला कौतुक वाटलें.



दर शनिवारीं सायंकाळीं मास्तर शाळेंतील मुलांना खेळायला सोडीत. जवळच्याच डोंगरावरील प्रशस्त मैदानांत आम्ही खेळायाला जात असूं. खेळाला प्रारंभ होण्यापूर्वींच कुसुम माझ्या कानांत हळूच पुटपुटे,

—वसंत मी तुझ्या बाजूला हं !

... आणि मी नेहमीं तिच्या बाजूनें खेळायचा !

माझ्याशिवाय शाळेंतल्या अन्य कोणाही मुलाकडे किंवा मुलीकडे तिचें जास्त दळणवळण नसे. वर्गांत बसून अभ्यास करतांना असो, किंवा मास्तरांच्या मेजाशेजारीं उभें राहून धडे देतांना असो, तिचे ते स्निग्ध, काळेभोर व विशाल डोळे आत्यंतिक स्नेहभावनेनें वारंवार मजकडे लागत.

एक ना दोन, प्रत्येक बारीकसारीक बाबतींत तिचें मजवरील गाढ व अमर्याद प्रेम पदोपदीं व्यक्त होत असे.

त्यावेळीं माझें वय तेरा वर्षांचें असून तिचें दहाच्या पलीकडे गेलेलें नव्हतें.



मराठी अभ्यासक्रम संपवून, पोर्तुगीज शिक्षणासाठीं मी स्कुलांत जाऊं लागलों, अन् आमच्या त्या खेडेगांवांतील रिवाजाप्रमाणें कुसुम जाणती ( ? ) झाल्यामुळें तिचें शिक्षण सहजच बंद झालें.

काम नसतां एकमेकांच्या घरीं जाण्यायेण्याची प्रथा आमच्या गांवांत नाहींच मुळीं. अशा स्थितींत कुसुमची व माझी भेट होणें मुष्किलीचें झाल्यास त्यांत नवल नाहीं. तरी मे महिन्यांत घरांतल्या विहीरींचें पाणी कमी होत असल्याकारणानें कुसुम स्नानाकरतां नेहमीं जवळच्या कुळागरांतील झरीवर येई. अन् ती येण्याच्या वेळीं एका हातांत टॉवेल व साबण नी दुसऱ्या हातांत तांब्या घेऊन तोंडानें कसलें तरी गाणें गुणगुणत मी झरीच्या मार्गानें चालूं लागें. येथें आम्ही निवांत बोलत बसूं.

एक दिवस असाच मी गेलों होतों. बिनचूक ७॥ वाजतां येणारी कुसुम आज १०॥ वाजले तरी आली नव्हती. मी बसल्या जागीं चुळबूळ करूं लागलों. आतां उशीर झाला म्हणजे लोकांची रहदारी सुरू होईल ह्या विचारानें मला बेचैन केलें.

इतक्यांत घाईघाईनें येतांना कुसूमची गोंडस मूर्ति दुरून माझ्या दृष्टीस पडली. आनंदानें माझें शरीर पुलकित झालें. पण कुसुमची थोडी गंमत करावी ह्या हेतूनें चेहऱ्यावर लटकाच राग आणून मी बसलों.

थोड्याच अवकाशांत कुसूम अगदीं जवळ आली. तिनें तांब्या खालीं ठेवला त्याचा केवढा तरी आवाज झाला. पण मी दादच लागूं दिली नाहीं.

—राग आला होय माझा ?

मी स्तब्धच.

—असं काय बरं तें ? मी मुद्दाम का उशीर केला ? आई जरा गडबडींत असल्यामुळं धाकट्या भाऊला धरून रहाणं मला भाग झालें. तुझ्या भेटीसाठीं माझा जीव आतुरतेनं कसा तळमळत असतो याची कल्पना जर तुला असती तर खचित तुला मजवर असं रागावतां आलं नसतं.

बोलतां बोलतां तिचा स्वर सद्गदित झाला. मी हळूच तिच्याकडे पाहिलें–तिचे डोळे भरून आले होते.

—कुसुम, हें काय? मी तुझ्यावर मुळींच रागावलों नाहीं. तुझी थोडी गंमत करावी म्हणून केलं सोंग. पूस पाहूं ते डोळे! कुसूम! इतकी कशी ग हळव्या अंतःकरणाची तूं? एवढं भावनाप्रधान असून या जगांत भागत नाहीं. क्षणभर मी रागावल्याचं सोंग आणलं तर तूं अश्रू गाळायला लागलीस. पुढें कसं ग होईल तुझं?—मी कळवळून म्हणालों.

—मी मुद्दाम कां तसं करतें? तुझ्याविषयीं मला काय वाटतं तें कसं बरं मी तुला सांगूं? कोणत्या शब्दांची योजना करून माझ्या मनांत चाललेल्या खळबळीचं वर्णन करूं? वसंत, तूं माझा लहानपणापासूनचा जिव्हाळ्याचा मित्र. तुझ्याशिवाय ह्या जगांत मला कांहींच प्रिय नाहीं.

—खरंच का मी एवढा भाग्यवान आहें कुसूम?—मी धन्यतेनें म्हणालों.

—अजून तुला शंका वाटते का? माझा इतक्या वर्षांचा परिचय असून तुला अजून माझी परीक्षा होत नाहीं?

—तसं नव्हे ग कुसुम! पण मी तरी तशी अपेक्षा कां करावी? तुझ्यासारख्या सुंदर नि नाजूक मुलीचं प्रेम माझ्यासारख्या काळ्या व कुरूप व्यक्तीवर बसूं शकेल असं मला वाटलंच नव्हतं.

—समजतं बरं मला! सारं समजतं—कुसुम एक कृत्रिम कोपकटाक्ष मजवर फेंकून म्हणाली. मी सुंदर, नाजूक व तूं कुरूप नव्हे का? तुझीं उलटीं बोलणीं न समजण्याइतकी मी खास दुधखुळी नाहीं.

—बरं! राहिलं आमचं. आतां तर झालं ना?—मी हंसून म्हणालों.

वस्तुतः कुसूम कांहीं तशी अप्सरा नव्हती. तथापि फारच मोहक होती. तिचें पाऊल नुकतेंच कुठें तारुण्याच्या उद्यानांत

पडत होतें. तिचा तो किंचित श्यामवर्ण, तें लांबट तोंड, ते लाल-भडक ओंठ, ती बारीक जिवणी, विशेषतः तिचे ते विशाल डोळे ! पुन्हा पुन्हा पहावेंसें वाटे तिचें तें रूप !

—कसला विचार चालला आहे वसंत ?—कुसुम माझ्याकडे तिरप्या नजरेनें पहात हंसून पुढें म्हणाली.

—तूं श्रीमंताचा मुलगा आहेस. तुझ्या योग्यतेला साजेसा हुंडा देण्याची ऐपत बाबांना नाहीं हें मी तुला सांगितलं पाहिजे का ?

—कुसुम ! तुला मात्र बोलतांना दुसऱ्याच्या हृदयाची पर्वा वाटत नाहीं अं ! तुझ्यापेक्षां हुंड्याचा मोह मला जास्त वाटतो असंच ना तुझं म्हणणं ?

—रागावूं नकोस रे वसंत ! आमच्या विवाहाच्या आड येणाऱ्या भावी अडचणींपैकीं एक मी तुझ्या निदर्शनास आणली एवढंच !

—कुसुम ! तूं कांहीं समज, पण मी तुला एवढेंच सांगतों, कीं विवाहबद्ध झालों तर तुझ्याशींच होणार.

यावर कुसुमनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. भावी सुखाच्या हिंदोळ्यावर ती डोलूं लागली. तिच्या डोळ्यांतून आनंदाश्रू वाहूं लागले.

कुसुम पायरीवर बसून झरींतल्या पाण्याशीं चाळा करीत होती आणि डोळ्यांतील अश्रु मला लपविण्याकरितां तिनें मान खालीं घातली होती.

मी झरींत उतरलों अन् तिच्या जवळ जाऊन तिचें मुख हल-केच वर केलें. तें कितीतरी मोहक वाटलें मला ! डोळ्यांतील आंसूं व तोंडावरील हंसूं यांचा मजेदार मिलाफ झाला होता तिच्या मुखावर ! आवेगभरांत चटकन् मी तिचें चुंबन घेतलें, हातांतल्या टॉवेलनें तिचे हळूच डोळे पुसले, अन्...

आजूबाजूस पाहिलें, कुळागरांत कोणीही नव्हतें. पलीकडच्या बांधावरून क्वचित्च एखादी कामकरी बाई किंवा लहान पोरें

जातांना दिसत होतीं. आमच्या घरांत पूजेची घंटा वाजूं लागली होती. जवळच्या देवळांत चौघडा वाजण्यास सुरवात झाली होती.

मला उशीर झाल्याची जाणीव झाली. मी म्हटलें,

—कुसुम ! तूं आटप आतां आंघोळ. उशीर बराच झाला.

—खरंच, बोलतां बोलतां वेळ कसा निघून जातो तें लक्षांतच येत नाहीं.—असें हंसत हंसत बोलून कुसुमनें झटपट स्नान उरकलें, लुगडें बदललें व ती घरीं जाण्यास निघाली. मला सोडून जातांना तिच्या हृदयांत होणारी कालवाकालव तिच्या मुद्रेवर स्पष्टपणें प्रतिबिंबित झाली होती.

—बरं. येतें मी वसंत ! तूंही आतां वेळ करूं नकोस.—असें म्हणून ती जाऊं लागली. जातांना, मी दृष्टीआड होईपर्यंत ती माझ्याकडे पुन्हा पुन्हा वळून पहात होती.

एक लांब सुस्कारा सोडून मी पाण्यांत उतरलों.



वरील हकिकतीनंतर पांच सहा वर्षें निघून गेलीं. मी यावेळीं ‘ लिसेव सेंत्राल ’× च्या पांचव्या वर्षांत होतों. पणजींतच वास्तव्य झाल्यामुळें तेथील वातावरणांत अन् शिक्षणांत माझं मन रमून गेलें. कुसुमची ओढ हळू हळू कमी होऊं लागली. केव्हां तरी रात्रौ कॉटवर पडल्या पडल्या कुसुमच्या सहवासांत घालविलेल्या गत दिवसांची गोड स्मृति मला होत असे. पण पुढें तर तिचा मला जवळ जवळ अजिबात विसर पडला.

...पण हें मनुष्यस्वभावास अनुसरूनच नव्हे का ? आपली आत्यंतिक जिव्हाळ्याची एखादी व्यक्ती निधन पावल्यानंतर किंवा दूर असल्यावर कांहीं काळानंतर तिची आठवण पुसट होतेच कीं नाहीं ?

---

× पणजी येथील उच्च पोर्तुगीज शिक्षणाची पाठशाळा.



मी त्या दिवशीं परीक्षा पास होऊन सुटींत घरीं आलों होतों. माझ्या लग्नाच्या गोष्टी घरांत चालल्या होत्या. एका प्रसिद्ध, कुलवान व श्रीमंत घराण्यांतली मुलगी मला सांगून आली होती. मुलीची माहिती मला अगोदरच होती. ती एक सुशील, सुंदर अन् चांगल्या स्वभावाची मुलगी म्हणून सारे परिचित लोक सांगत. माझ्या घरच्या साऱ्या मंडळींना तें स्थळ मनापासून आडवलें होतें. उभयपक्षीं सर्व कांहीं ठरल्यासारखेंच होतें. केवळ माझ्या मान्यतेवर पुढील सर्व बेत राहिले होते. उलटपक्षीं, कुसुमचें स्थळ आमच्या घरांत कोणालाही पसंत पडण्यासारखें नव्हतें. कारण तिचे वडील चांगल्या श्रीमंत, प्रतिष्ठित नि वजनदार घराण्यापकीं नव्हते.

कुसुमची ओढ तितक्या उत्कटतेनें आतां मला नव्हती. अशा स्थितींत चट्कन लग्नास मान्यता देऊन मी मोकळा झालों व लवकरच विवाहबद्ध झालों.



लग्नाची माळ गळयांत पडल्यानंतर पत्नीच्या सहवासाची मोहिनी प्रभावी ठरून पुढील शिक्षणास मी त्याच वर्षी राम राम ठोकला.

नव्या नवलाईचें वर्ष कसें आनंदांत नि उन्मादांत निघून गेलें तें कळलेंसुद्धां नाहीं.

एके दिवशीं अकस्मात् कुसुमच मला पत्र आलें. पत्र पुढीलप्रमाणें होतें :—

‘ माझ्या प्रिय वसंता,

तुला माझं हें पहिलं नि शेवटचं पत्र आहे. मी अगदीं, थोड्याच दिवसांची सोबतीण आहें. मरण्यापूर्वी तुला डोळे भरून पहावं एवढीच तळमळ अंतःकरणाला लागून राहिली आहे. तुझी पत्नी सुशील अन् सुंदर आहे असं ऐकतें. तिला पहाण्याचें भाग्य माझ्या नशिबांत नसावं असं वाटतं.

तिच्या सहवासांत तुला मार्कंडेयाचं आयुष्य लाभो नी सुखांत जावो असं इच्छितें.

तुझ्यावर मी मनापासून प्रेम केलं नि आमरण करीत राहीन. लौकिक दृष्ट्या तुझी सहधर्मचारिणी होण्याचं महत्‌भाग्य या जन्मीं मला लाभलं नाहीं. तेवढी पुण्याई माझ्या पदरांत नसावी ! पुढच्या जन्मीं तरी माझी ही इच्छा पूर्ण होईल का ?

मला क्षय झाला आहे. असा दचकूं नकोस वसंत ! मी ही इष्टापत्तिच समजतें. तुझ्यावांचून अन्य पुरुषावर पति या नात्यानं प्रेम करणं मला कदापि शक्य नाहीं.

माझी सोरगत जुळविण्याच्या कामीं बाबांनीं आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा केली. पण माझ्या पुण्याईमुळं त्यांचं कुठंच साध्य झालं नाहीं. माझं भीषण भवितव्य स्पष्ट अन् उघड दिसत असल्यानं त्यांनीं तो नाद सोडला आहे आतां.

या दिवसांत केव्हां तरी येऊन एक वेळ तूं मला भेटशील ना ? ह्या हतभागिनीची एवढी प्रार्थना तूं मान्य करशील ना ?

सर्वस्वी तुझीच,
दुर्दैवी **कुसुम.**

हें पत्र वाचून माझ्या अंतःकरणाला जोराचा धक्काच बसला. कुसुमची प्रकृति बरी नाहीं, बारीक ताप येतो ' असें मागें घरांतील कोणी तरी बायका बोलतांना मी ओझरतें ऐकलें होतें. पण तिचा आजार एवढ्या थराला गेला असेल अशी कल्पनाहि नव्हती.

मी तें पत्र किती तरी वेळां वाचलें. तिच्या सहवासांत अनुभवलेले गोड प्रसंग माझ्या डोळ्यांसमोर उभे राहिले. कुसुमच्या बाबतींत मी अक्षम्य अपराध केला आहे असें माझें मन मला सांगूं

लागलें. आतां कुसुमची कोणत्या तोंडानें भेट घ्यावी याचाच मला पेंच पडला.

卐

दुसऱ्याच दिवशीं संध्याकाळीं सहा वाजण्याच्या सुमारास फिरायला जाण्याच्या निमित्तानें मी कुसुमच्या घरीं गेलों.

घरांत पुरुष मंडळी कोणीहि दिसत नव्हती. कुसुमची आई ओटीवर बसून तांदूळ निवडीत होती. जवळच एक लहान मुलगा कसला तरी खेळ खेळत होता.

मला पहातांच कुसुमची आई, झटकन् उठून उभी राहिली. मी हळूच विचारलें,

—रमेश नाहीं का घरांत ?

रमेश तिचा वडील मुलगा. पाठीला पाठ लावून आलेला कुसुमचा भाऊ !

—नाहीं. नुकताच बाजारांत गेला आहे तो. येईल इतक्यांत. बसा ना !—असें म्हणून कुसुमच्या आईनें मला बसण्यास लगबगीनें खुर्ची आणून दिली.

—कुसुमची प्रकृती बरी नाहीं म्हणे !—मी खुर्चीवर बसतां बसतां दबकत विचारलें.

—होय. आज सरासरी वर्ष झालं. तिच्या जिवास आराम नाहीं. प्रथम बारीक ताप येऊन दुखण्यास सुरवात झाली. अजून ताप येतच आहे. अशक्तता तर पराकाष्टेची आलेली आहे. ती इतकी कीं तिला आतां ओळखण्यासुद्धां आपणास जड जाईल. औषधं किती तरी डॉक्टरांचीं अन् वैद्यांचीं दिलीं, पण गुणाच्या नांवानं शून्य. मानसिक धक्का बसल्यामुळं तिची अशी स्थिति झाली आहे, असं वैद्यांचं म्हणणं आहे. आणि तेंही बव्हंशीं खरं असावं असं वाटतं. आज वर्ष झालं. ती कधीं मनमोकळेपणानं कुणाशीं

बोललेली व इंसलेली आम्ही पाहिलेली नाहीं. नेहमीं आपल्या खोलींत एकांतांत कसला तरी विचार करीत किंवा एखादं पुस्तक वाचीत असायची ! आम्ही परोपरीनं तिला सांगितलं, ' अग ! तूं अशी खिन्न कां ? तूंच का तेवढी वाढलेली आहेस ? तुझ्यापेक्षां कितीतरी मोठ्या मुली लग्नाशिवाय आमच्या समाजांत आहेत. बरं, आम्ही प्रयत्नांची कसूर का करतों ? पण कुठंच जुळून येत नाहीं त्याला काय बरं करावं ?

बोलतां बोलतां तिचा गळा भरून आला. तिच्यानें पुढें बोलवेना. ती पदरानें डोळे पूसूं लागली.

—कुठं आहे कुसुम ?—मी अधीरतेनें विचारलें.

—त्या समोरच्या खोलींत आहे. या तुम्ही.—असें बोलून तिनें मला त्या खोलींत नेलें.

कुसुम अंथरुणावर निजून होती. झोंपलेली नव्हती. उशाशीं गोविंदाग्रजांची ' वाग्वैजयंती ' उघडीच पडली होती. आणि तिच्यांतील ' प्रेम आणि मरण ' ही कविता तेथूनच अस्पष्टपणें मला दिसत होती.

—कुसुम ! हे पहा तुझ्या समाचाराला आले आहेत.—बरं मी येतें हं लवकरच !—असें बोलून कुसुमची आई तेथून निघून गेली. बहुधा चहाची तयारी करण्याकरतांच ती निघून गेली असावी.

कुसुमला पाहिल्याबरोबर मी तर अगदीं थिजूनच गेलों. अगदीं गहिंवरून जाऊन मी रुद्ध कंठानें हांक मारली,

—कुसुम ! कुसुम !

अडविलेलें बंधाऱ्याचें पाणी सुटल्यानंतर जसें एकदम उसळी मारतें तद्वतच माझें झालें. मला भावनावेग असह्य झाला. मी खुर्चीवरून उठून तिच्या अंथरुणावर जाऊन बसलों अन् कुसुमचें डोकें दोन्ही हातांत धरून मी म्हटलें,

—कुसुम ! मी तुझा अनंत अपराधी आहे. माझी अक्षम्य चूक झाली. तरीही तूं मला क्षमा करशील काय ? कुसुम, बोल. 'क्षमा केली' असं तुझ्या तोंडून निघाल्याशिवाय माझ्या हृदयाची तळमळ मुळींच कमी होणार नाहीं.

—वसंत ! असं काय बरं करायचं ?—माझा हात आपल्या हातांत घेऊन कसुम म्हणाली, तुला क्षमा मी कसली बरं करायची ? नशीबांत असलेलं टळविणं कुणाच्या बरं हातीं आहे ? आतां तुझा आग्रहच असेल तर 'क्षमा केली' असं मी म्हणतें. वसंत ! आतां पूस पाहूं ते डोळे ! असं रडून कसं बरं चालेल ? तुला माझं पत्र मिळालं ना ? तुला एकवार डोळे भरून पहाण्याची एकच इच्छा माझ्या मनांत उत्कटतेनं होती. आतां मी धन्य झालें...तुला डोळे भरून पाहिलं, तुझ्याशीं प्रेमानं बोललें. फार झालं. एवढी अपेक्षा नव्हती मी केली !—बोलतां बोलतां तिनें मला प्रेमभरानें जवळ ओढून माझें चुंबन घेतलें. कुसुमच्या अंगांत बिलकूल त्राण नव्हतें. थोड्याशाच श्रमानें तिला श्वास लागला. जरा थांबून ती म्हणाली,

—वसंत ! तुझीच पत्नी म्हणून मी मरणार आहें. जगाच्या दृष्टीनं मी जरी तुझी पत्नी नसलें तरी पति म्हणूनच मी तुला माझ्या अन्तःकरणांत स्थान दिलं आहे.

—कुसुम ! पुरे. नाहीं ऐकवत माझ्यानं हें ! तुझा प्रत्येक शब्द माझं हृदय जणुं चिरून जात आहे. कुसुम ! तुझ्यावरील प्रेमाला थोडा वेळ विस्मृतीचं ग्रहण लागलं अन् त्याच स्थितींत, त्या अंधकारांत मी विवाहित झालों.........

बोलतांना मला पुन्हा रडूं कोसळलें.

—छीः ! वसंत ! काय हा तुझा वेडेपणा ? शपथ आहे तुला माझी आतां डोळ्यांतून पाणी काढशील तर ! असा कां बरं तूं कष्टी

होतोस ? माझा ऋणानुबंध तेवढाच होता, त्याला कोण काय करणार ? —कुसुम क्षीण हास्य करून म्हणाली.

—नाहीं कुसुम ! तूं अजून बरी होशील ! मरणाचे विचार तूं वारंवार कां बरं मनांत आणतेस ?

—नाहीं वसंत, तुझा हा निव्वळ भ्रम आहे... बरं, तें असो. आई येईल इतक्यांत. तूं खुर्चीवर जाऊन बस आतां.—असें म्हणून कुसुमनें पुन्हां मला जवळ ओढलें व माझीं कितीतरी चुंबनें घेतलीं.

मी जरा वेळ तिच्या छातीवर हलकेंच मस्तक टेकलें, तिच्या मुखावरून प्रेमभरानें हात फिरविला अन् तिचें एक चुंबन घेऊन निरुपायास्तव उठून मी खुर्चीवर बसलों.

अंमळशानें कुसुमच्या आईनें चहा आणला. बरोबर कांहीं फराळाचेंहि आणलें होतें.

कुसुमनें आग्रह करकरून मला तें खावविलें. तिच्या शब्दाला मान देण्याकरितां त्या शोकाकुल स्थितींतहि बशींतले जिन्नस मी कसेबसे घशांत घातले.

थोड्या वेळानें भरल्या डोळयांनीं कुसुमचा मोठ्या कष्टानें निरोप घेऊन खिन्न अन्तःकरणानें व जड पावलांनीं मी घरीं परतलों.



......आणि, वरील प्रसंगानंतर अवघ्या चारच दिवसांनीं कुसुमचा पुण्यात्मा हा नश्वर देह सोडून गेल्याचें हृदयविदारक वृत्त माझ्या कानांवर आलें.

———

भावनेचा बळी—कला
व्यं. अ. पै रायकर.

# हिरवा प्रकाश

रात्रीचे दहा वाजून गेले होते. पणजी शहरांत जिकडे तिकडे सामसूम झाली होती. अशा वेळीं झोंप येईना म्हणून नुसत्या शर्टनेंच मी फिरायला निघालों होतों.

समुद्राच्या किनाऱ्यावरील रस्त्यावरून शीतल वायूचा आस्वाद घेत चालतां चालतां मनाला कसें अगदीं प्रसन्न वाटूं लागलें.

रात्रीची पणजी शहराची शोभा, विशेषतः समुद्रकिनाऱ्यावरील 'काम्पाल'च्या रस्त्यानें फिरतांना अगदीं पूर्णत्वानें खुलून दिसते.

एका बाजूला आपल्या संगीतानें अहोरात्र जागविणारा तो समुद्राचा फांटा, दुसऱ्या बाजूला एका ओळीनें असलेले ते निर-निराळ्या पद्धतीचे नमुनेदार टुमदार बंगले, त्यांच्या समोरच्या त्या लहान लहान फुलझाडांच्या बागा, त्यांच्यापुढें तो लांबच लांब, काळाकुट्ट, विस्तीर्ण डांबरी रस्ता व त्यांच्या दुतर्फा रांगेनें उभीं असलेलीं तीं नंदनगोळीचीं डौलदार झाडें; आणि ह्या सगळ्यांना आपल्या धवल तेजानें न्हाऊं घालणारे ते रस्त्यावरील बिजलीचे दिवे; तें सर्व दृश्य किती तरी सुंदर व मनाला आनंद देणारें होतें.

चालत चालत मी बराच लांब गेलों. सगळीकडे वातावरण शांत होतें. नाहीं म्हणायला कुठल्याशा क्लबांत चालत असलेल्या ख्रिश्चन स्त्रीपुरुषांच्या नाचाचा तालबद्ध आवाज व त्याची सुरेल साथ दुरून कानावर पडत होती आणि जवळच्या एका बंगल्यांतून निघणारे पियानोचे मधुर स्वर माझ्या नादलुब्ध मनाला गुंगवीत होते.

पियानोच्या त्या स्पष्ट अन् मोहक आवाजानें मी अगदीं भारूनच गेलों. घराकडे परतण्याचेंही मला भान राहिलें नाहीं. जवळच्याच एका बांकावर बसून, तन्मयतेनें ते सूर मी ऐकूं लागलों.

बऱ्याच वेळानें पियानोवादन बंद झालें. त्याचे गोड स्वर ऐकूं येईनासे झाले. मी चटकन् रिस्टवॉचकडे पाहिलें. बारा वाजून केव्हांच गेले होते.

मी गडबडीनें उठलों व आतां चालायला लागणार, इतक्यांत दुरून येणाऱ्या मोटारीच्या दिव्यांचा तेजस्वी स्रोत मला दिसला. मी क्षणभर तिथेंच थबकलों. एक दोन क्षणांत ती मोटार भरकन् माझ्या समोरून निघूनही गेली.

ती बेबी ऑस्टीन कुणाची होती हें ओळखण्यास मला वेळ लागला नाहीं व त्यांत बसलेल्या व्यक्तीची ओळख तर दिव्याच्या प्रकाशांत मला तेव्हांच पटली.

मोटारींत मागच्या बाजूला कुणीही नव्हतें. कुसुमाकर एकटाच पुढें बसून मोटार हांकीत होता.

इतक्या रात्रीं कुसुमाकर ह्या बाजूनें कुणीकडे चालला असावा, याचा चटकन् बोध होईना. तथापि लगेच माझ्या मनाला एक विशिष्ट शंका चाटून गेल्याशिवाय राहिली नाहीं.

कुसुमाकराला मी चांगला ओळखत होतों. स्वभावानें उमदा, मनाचा दिलदार, रूपानें सुंदर, अंगकाठीनें मजबूत असा तो सत्तावीस अठ्ठावीस वर्षांचा बुद्धिमान् तरुण होता; एवढेंच नव्हे, तर आपल्या कलाकुशल लेखणीनें साऱ्या तरुण, रसिक महाराष्ट्राचें

लक्ष, अल्पावधींतच त्यानें आपल्याकडे आकृष्ट करून घेतलें होतें. तरुण–तरुणींच्या हृदयाची पकड घेऊन लिहिणारा लेखक म्हणून त्याची गोमंतकाबाहेर फार प्रसिद्धी होती. मात्र खुद्द गोमंतकांत त्याच्या स्वतःच्या व्यक्तित्वाच्या योग्यतेप्रमाणें त्याला मान मिळत नव्हता. उलट कांहीं नाकानें कांदे सोलणाऱ्या सनातनी व ढोंगी लोकांच्या डोळयांत एखाद्या शल्याप्रमाणं तो खुपत होता. त्याचें जिवंत लिखाण, बेदरकार वृत्ति आणि त्याचें विलासी जीवन, या सर्वांचा भलताच विपर्यस्त अर्थ करून त्याच्या खासगी आचरणा-बद्दल निरनिराळे प्रवाद समाजांत पसरविण्यास त्याच्या शत्रूंनीं कंबर कसली होती असें म्हटलें तर अतिशयोक्ति व्हायची नाहीं. पण आमच्या कुसुमाकराला त्याची मुळींच पर्वा नव्हती. किंवा त्याबद्दल त्याला चीडही येत नव्हती. उलट त्याला आपल्या निंदकांची कींवच येई.

माझ्याइतका त्याचा जिवाभावाचा निकट स्नेही दुसरा कोणीही नव्हता. कुसुमाकराच्या अंतरंगाची खरी पारख मला होती. त्याचा भावनाप्रधान स्वभाव, त्याची बेदरकार वागणूक, व सामाजिक जबाबदारीबद्दल नेहमीं असणारी त्याची उदासीनता, यामुळें निर्मल, निष्पाप नी उदार हृदयाच्या या कर्तबगार तरुणा-बद्दल विनाकारण संशयास्पद वातावरण निर्माण व्हावें याची मला वारंवार खंत येई. म्हणून समाजाकडे पहाण्याची बेफिकीर वृत्ति जरा बदलण्याबद्दल मी ज्या ज्या वेळीं त्याला उपदेश करीं त्या त्या वेळीं तो मला हंसून म्हणे,

—वेडा आहेस तूं मनोहर ! हें असं चालायचंच जगांत !—इतकें म्हणून जगांतील असामान्य लेखक ठरलेल्या चेकॉव्ह, मोपासां इत्यादिकांचा आयुर्वृत्तांत सांगायला तो सुरवात करी.

यावर मी काय बोलणार ? त्याच्या बिनतोड युक्तिवादानें अन् प्रभावी वक्तृत्वानें मी क्षणभर दिपूनच जाई !

एखाद्या चलच्चित्रपटाप्रमाणें उभ्या उभ्याच हे सर्व विचार झरझर माझ्या डोक्यांत येऊन गेले.

थोड्याच अंतरावर रस्त्यावरच मोटार उभी राहिलेली मी पाहिली आणि लगेच नंदनगोळीच्या झाडांच्या आडोशांत दबत दबत, मंद पावलांनीं मी तिथें गेलों. पहातों तों कुसुमाकर अस्वस्थ मनानें रस्त्यावर येरझारा घालीत होता व मधून मधून जवळच्या एका विशिष्ट बंगल्याकडे त्याची नजर स्थिर होत होती.

यावेळीं त्याच्या चेहऱ्यावर उत्कंठा, संशय, निराशा, आनंद, वगैरे वेगवेगळे भाव नाचत होते. त्याचें लक्ष आजूबाजूस कुठेंच जात नव्हतें; तर पुन्हां पुन्हां अस्थिर वृत्तीनें तो त्या बंगल्याकडे पहात होता.

त्याचा पोशाख अगदीं साधा पण स्वच्छ होता. फिक्कट गुलाबी रंगाच्या फ्लॅनेलची पॅंट त्यानें घातली असून, अंगांत बिनबाह्यांचा व उघड्या कॉलरचा शुभ्र शर्ट होता.

रस्त्यावरील दिव्यांच्या तेजस्वी प्रकाशांत स्पष्टपणें दिसणारा त्याचा सुंदर चेहरा, वाऱ्याच्या झोतानें इतस्ततः उडणारे त्याचे कुरळे केस, एखादे वेळीं त्याच्या विस्तीर्ण भालप्रदेशावर दृश्यमान होणाऱ्या त्या बारीकशा आंठ्या, अधूनमधून आपला खालचा ओंठ दातांनीं दाबून धरून उभें राहाण्याची त्याची ती ऐटबाज ढब आणि त्याचें तें गोंडस शरीरसौष्ठव, हें सगळें माझ्या पुरुषी मनालासुद्धां मोहून टाकण्यास समर्थ होतें.

कसल्या तरी गूढ व गुप्त हेतूनें कुसुमाकर आज इथें आलेला असावा असें मात्र माझ्या मनानें पक्कें घेतलें. व कांहीं झालें तरी याचा पुरा तलास लावल्याशिवाय घराकडे परतायचें नाहीं असें ठरवून मी हळूच पुढें झालों.

उघड्यावर जरी मी आलों, तरी माझ्याकडे त्याच मुळींच लक्ष गेलें नाहीं. आपल्याच नादांत गुंग होऊन तो त्या बंगल्याकडे एखाद्या वेड्यासारखा बघत होता.

शेवटीं मी अगदीं त्याच्याजवळ जाऊन त्याला हांक मारली,

—कुसुमाकर! अरे, एवढा गुंग होऊन काय पहातो आहेस त्या घराकडे?

एखादा वाटसरू निःशंक मनानें मऊ मऊ हिरवळीवरून चालतांना, अकस्मात् त्यांत दडून बसलेल्या सापावर त्याचा पाय पडावा म्हणजे जसा तो वाटसरू दचकतो तद्वतच कुसुमाकर दचकला. त्यान एकदम चमकून माझ्याकडे पाहिलें व जवळ जवळ चांचपडतच म्हटलें,

—कोण?...मनोहर?...अरे, इकडे कुठं तूं यावेळीं?

—वाः! छान तुझा हा प्रश्न! मी कुठं म्हणून का विचार-तोस? अरे, मी तर इथंच पणजीस असतों हें तूं विसरलास वाटतं? पण रायबंदरचा गृहस्थ, इतक्या रात्रीं मोटार घेऊन इथं, या टोंकाला यावा आणि एखाद्या घराकडे पाहात, रस्त्यावर त्यानं येरझारा घालाव्या याचा अर्थ काय असावा तें माझ्या लक्षांत तर नाहीं बुवा येत!

—हं!...तसं...नव्हे रे!—कुसुमाकर माझ्या खांद्यावर आपले दोन्ही हात ठेवीत म्हणाला.—आज हवा कशी छान पडली आहे; म्हटलं जावं घेऊन आपली कार अन् यावं असं सहज मजेंत फिरून!

—अस होय?...आणि त्या पलीकडच्या घराकडे पहात, एवढं कसलं बारीक निरीक्षण चाललं होतं मघांपासून? मांजरानं दूध पितांना आपले डोळे मिटले म्हणून जगाचे डोळे कांहीं झांकले जात नसतात बरं का!

माझ्या या भाषणानें कुसुमाकर चांगलाच चमकला. त्याचा उमदा चेहरा क्षणमात्र काळवंडलाही! पण दुसऱ्याच क्षणीं चेहऱ्यावर लटकेंच हास्य आणून त्यानें म्हटलें,

—छेः रे! उगीच कांहीं तरी तुझं! कसल्याही बाबतींत नसते तर्ककुतर्क काढायचे हा तुझा स्वभावच मुळीं!

—कुसुमाकर, तुझी इच्छा नसली तर तुझं गुपीत तूं मला सांगावंस असा कांहीं माझा तुला आग्रह नाहीं; पण एखादे वेळीं भावनेच्या भरांत भलताच अविचार करून बसशील आणि मग पस्तावशील म्हणून मला आपलं वाटतं, तुझं हितगुज समजून घ्यावं. तुझ्या हितासाठीं माझं अंतःकरण तीळतीळ कसं तुटत असतं याची कल्पना तुला कुठली व्हायला !

माझ्या बोलण्यांतील जिव्हाळा त्याला जाणवल्याशिवाय राहिला नाहीं. तो एकदम वरमून म्हणाला,

—मनोहर, असा नको रे माझ्यावर रागावूंस ! चूक झाली खरी माझी ! आतां सर्व कांहीं मी तुला मोकळ्या अंतःकरणानं सांगतों. ये, बैस असा माझ्याजवळ मोटारींत—असें म्हणून कुसुमाकरें झटकन् मोटारीचें दार उघडून मला आंत बसवलें. आपण येऊन माझ्या शेजारींच बसला आणि एकदम सफाईनें दार लावून घेत त्यानें माझ्याकडे वळून म्हटलें,

—त्याचं असं झालं मनोहर ! नंदिनीला तूं ओळखतोस ना ?

—कोण नंदिनी ? कामतांची मुलगी का ?

—होय; तीच. आमचं परस्परांवर लहानपणापासून कसं प्रेम होतं, त्याचा पुढं कसा विकास होत गेला हें मी तुला सांगितलं पाहिजे का ?

—तें आहे रे सगळं मला माहित ! पण आतां इतक्या रात्रीं इथं उभा राहून त्या तिच्या घराकडे पहाण्याचं कारण काय तें नाहीं मला कळत !— मी मुद्दाम वेड पांघरून म्हणालों. कारण माझी शंका खरी ठरू पहात होती.

—अरे, माझं ऐकून तरी घे पुरतं ! अन् मग मला काय विचारायचं असेल तें विचार !

—बरं बाबा; चुकलं माझं ! — मी हंसून म्हटलें.— आतां पुढं सांगशील तर खरा !

कुसुमाकर पुढें सांगूं लागला.

—गोत्राच्या भ्रामक नी वेडगळ समजुतीला बळी पडून नंदिनीच्या वडिलांनीं तिचें लग्न दुसरीकडे करून दिल्यास आज तीन वर्षे होत आलीं असतील; पण तिचं माझ्यावरील किंवा माझं तिच्यावरील निस्सीम प्रेम तिळमात्र कमी झालेलं नाहीं. याचं प्रत्यंतर म्हणजे, मी अजून विवाहबद्ध झालेलों नाहीं हें होय. आमच्या समाजाच्या चालीरीतीमुळं मनमोकळेपणानं एकांतांत बोलण्यास आतां आम्हांस मिळत नाहीं हें जरी खरं असलं, तरी आमच्या भेटी केव्हां केव्हां होत असतातच! येथील देवळांत अधूनमधून होणाऱ्या उत्सवाच्या वेळीं नंदिनी येत असते. म्हणून, सहसा देवळांत कधीं न जाणारा मी, तिला केवळ डोळे भरून पाहाण्यासाठीं व तिच्या सुंदर, भावनापूर्ण डोळ्यांतून अमृताचा वर्षाव मजवर करून घेण्यासाठीं, प्रत्येक उत्सवांस हजर रहाण्यास केव्हांही चुकत नसतों....

—देवळांत त्यावेळीं एखाद्या बुवाचं कीर्तन चालो, सप्ताहाचं दिंडीभजन ऐनरंगांत असो, किंवा देवळाबाहेरील भव्य मंडपांत एखाद्या गांवठी नाटकाचा ‘अप्रतिम’ खेळ चाललेला असो, आमचं लक्ष तिकडे कुठंच जात नसे. आमचे नेत्र परस्परांवर अतृप्त अन् प्रेमाच्या आत्यंतिक भावनेनं नेहमीं लागलेले असायचे!

—पण, असं जरी असलं तरी नंदनीचं कठोर संयमन खरोखर एखाद्या देवतेलाच शक्य आहे; मानवी देहाला नाहीं!...

—अगदीं बाल्यावस्थेपासून तिचा माझ्याकडे विलक्षण ओढा होता. पुढं पुढं तारुण्यांत पदार्पण करूं लागल्यापासून ती मजकडे भावी पतीच्या नात्यानं पाहूं लागली, आणि हळु हळू माझ्यावरील प्रेमानं तिच्या हृदयाचा कोपरान् कोपरा भरून गेला. अर्थात्, अशा स्थितींत लग्नानंतर ती मला विसरूं शकली नाहीं, किंवा

आपल्या हृदयांत स्थिर झालेलं माझ्याबद्दलचं प्रेम चळलं नाहीं, म्हणून तिला दोषी ठरवतां येईल काय? मी तर माझ्या देहांत प्राण असेतोंपर्यंत तिला विसरूंच शकत नाहीं. माझ्या हृदयाची स्वामिनी तीच आहे असं मी समजतों.

इतकें बोलून कुसुमाकर किंचित्काल गप्प राहिला. जिकडे तिकडे शांत दिसत होतें. नाहीं म्हणायला पलीकडच्या मोठ्या रस्त्यावरून एखादी मोटार भर्रकन् जातांना काय तो शांतताभंग होत होता तेवढाच!

मी सहज कुसुमाकराकडे बारीक नजरेनें पाहिलें. त्याचे डोळे प्रेमार्द्र झालेले मला दिसले. त्याच्या रोमरोमांतून त्याला नंदिनी-विषयीं वाटणारें प्रेम जणुं स्फुरत आहे असें मला वाटलें. कसल्या तरी गोड मादक विचारांनीं भारून गेल्याप्रमाणें धुंद नजरेनें तो बाहेर पहात होता.

समुद्र उल्हासानें नाचत होता, अन् वारा त्याला साथ करीत होता. त्या दिवशीं पौर्णिमा असल्यामुळें चंद्र अगदीं माथ्यावर आला होता व त्याच्या प्रकाशानें चकाकणाऱ्या समुद्राच्या लाटांचा पाठशिवणीचा खेळ मजेदार दिसत होता.

नंदिनी आणि कुसुमाकर यांच्या प्रेमाची मला पूर्ण माहिती होती; एवढंच नव्हे, तर तिच्या लग्नापूर्वी त्यांच्या गोड भेटीचे उत्कट प्रसंग नी प्रेमरसानें ओथंबलेलीं त्यांचीं संभाषणें, मला कैक वेळां खुद्द कुसुमाकराच्या मुखांतून कळलीं होतीं. पण अजून-पर्यंत त्याचें तें प्रेम तसेंच स्थिर राहिलें असेल याची मला आतां पर्यंत कल्पना नव्हती. पण आतां सर्व उलगडा झाला. तथापि, आज इथें येण्याचा त्याचा हेतू काय असावा तें लक्षांत न आल्या-मुळें मी त्यास पुन्हा म्हटलें,

—पण कुसुमाकर, तूं आतां इथं कां आला होतास तें अद्यापि नाहीं सांगितलंस!

माझ्या प्रश्नाचा रोख पाहून त्यानें क्षणभर माझ्याकडे टक लावून पाहिलें, माझा हात आपल्या हातांत घट्ट धरला आणि किंचित् आर्जवी स्वरांत म्हटलें,

— असं पहा मनोहर, पुरुषांचं प्रेम कितीहि उच्च, सात्विक, अन् उदात्त स्वरुपाचं का असेना, पण त्यांत सूक्ष्मपणं वसत असलेल्या लैंगिक भावनेवर विजय मिळवणं कमालीचं दुरापास्त असतं नाहीं का?

कुसुमाकर माझ्याशीं बोलत होता खरा; पण मधून मधून कां कोण जाणे तो त्या बंगल्याकडे आपली दृष्टि लावीत होता, व त्या दृष्टींत आतुरता, संशय, आनंद व्यक्त होत होता.

— स्त्रियांचं शारीरिक सामर्थ्य जरी पुरुषाच्या तुलनेनं पाहतां कमजोर असलं, तरी मनावर विजय मिळविण्याच्या बाबतींत त्या पुरुषांपेक्षां केव्हांही श्रेष्ठच ठरतील! पुरुष व स्त्री यांच्या मनोवृत्तींतील अंतर इथं स्पष्ट नी उघड होत आहे. आतां हेंच पाहीनास तूं!–आज तीन वर्षे झालीं, नंदिनीच्या हृदयांत मजवरील प्रेमाची ज्योत एकाद्या नंदादीपाप्रमाणं अखंड तेवत असली, तरी शक्य असूनही आमच्या एकांताचे प्रसंग ती सहसा आणूं इच्छीत नाहीं.

— एक दिवस तर पूर्ण एकांतांत भावनेच्या आवेगासरशीं माझ्या हातून अतिप्रसंग घडेल, असं मला वाटलं. पण कशा युक्तीनं नी गोडीगुलाबीनं मला मुळींसुद्धां न दुखवितां तो प्रसंग तिनं टाळला! एक ना दोन असे किती तरी प्रसंग आठवले, म्हणजे तिच्या दुर्दमनीय आत्मसंयमनाची नी अलौकिक पातिव्रत्याची कल्पना येते.

— पण अशा वेड्या, भ्रामक, परिस्थितीसापेक्ष नीतीकल्पनांच्या नादीं लागून तिनं आपली अशी वंचना करून घ्यावी, मनाचा कोंडमारा करावा व नेहमीं पिचत रहावं हें मला मुळींच पसंत नाहीं म्हणून मी तसं तिला कितीतरी वेळां सांगितलं, पटवून

दिलं. असं असतांही तिच्या मनावर त्याचा कांहींच अनुकूल परिणाम होत नाहीं...

—आणि हा कोंडमारा मला तर दिवसेंदिवस असह्य होत चालल्यामुळं, काल तिच्याशीं नाईलाजानं मला जरा कठोर व्हावं लागलं. तें असं झालं...

इथें तो थांबला. मी जरा आजूबाजूस पाहिलें.

मघांची शांतता आतां बरीच वाढली होती. रस्त्यावरील विजेच्या दिव्यांच्या प्रकाशानें फसून जाऊन पहांट झाली म्हणून, आसपासच्या नंदनगोळीच्या व माडांच्या झाडांवर कावळ्यांनीं कर्कश ओरड चालविली होती. जवळच्या भव्य चर्चमध्यें मरणाच्या निदर्शक अशा अशुभ घंटा, विशिष्ट तऱ्हेनें वाजत होत्या. खडकांवर जोरजोरानें फुटणाऱ्या प्रचंड लाटांचा आवाज भेसूर वाटत होता. आणि थोड्याच वेळापूर्वी हंसणाऱ्या आकाशांतील चंद्राला काळ्या कुट्ट ढगांनीं ग्रासून टाकलें होतें.

—काल मी इथं असा सहजच आलों होतों—कुसुमाकर आपली हकीकत सांगूं लागला.—नंदिनीचा पति कसल्याशा कामानिमित्त कारवारला गेल्याचं मला कळलं होतं. घरांत तिची वृद्ध विधवा सासू व एक धाकटा दीर एवढीच मंडळी असल्यामुळं तिची गुप्तपणं भेट घेण्याची सुसंधी काल मला मिळाली. त्यावेळीं मी तिला म्हटलं होतं,

—"नंदिनी, तुला ह्या अभागी कुसुमाकराची थोडीसुद्धां दया नाहीं ना ग येत ? आज तीन वर्षे झालीं, तूं मला नुसती झुलवीत आहेस ! माझ्या हृदयाचं पूर्ण समाधान तूं कधींच नाहीं ना करावयाचीस ?"

—"कुसुमाकर, अजून तुला माझ्या हृदयाची परीक्षा होऊं नये ना ? माझं सारं अंतःकरण, केवळ तुझ्या मूर्तीनंच व्यापून टाकलं आहे. मी सवस्वीं तुझीच आहें आणि तुझ्या इच्छेबाहेर

मला स्वतःचं निराळं अस्तित्व नाहीं असं मी कंठरवानं ओरडून सांगत असतांही तुला तें खरं नाहीं का वाटत ? केवळ तुझ्या मर्जीवर, तुझ्याच हातांत असलेलं माझं पातिव्रत्य चुरगळून टाकून किंवा त्याच्यावरील शेवटचा पडदा बाजूला सारून तुला काय बरं मिळणार आहे ?" नंदिनी माझा हात आपल्या हातांत घट्ट दाबून धरून केविलवाण्या स्वरांत म्हणाली.

—"नाहीं" मी निकरानं, मान हलवून गंभीर स्वरांत म्हणालों. "नंदिनी, आज निर्धारच करून मी आलेलों आहे. काय तो बरा वाईट सोक्षमोक्ष केल्यावांचून रहाणं, मला आतां अशक्य आहे. आज तीन वर्षेपर्यंत मी धीर धरला, तुझ्या नानातऱ्हेच्या सबबी ऐकल्या. आतां मात्र तुझं कसलंच विरोधात्मक उत्तर ऐकायला मी मुळींच तयार नाहीं. इतके दिवस मी तुझंच ऐकत आलों; आतां एक वेळ तरी, तूं माझं ऐकलं पाहिजेस ! न पेक्षां हा कुसुमाकर, तुला ह्या क्षणापासून अंतरलाच म्हणून समज. यापुढं आमचं प्रेम संपलं असं मी समजेन." मी अगदीं एकेरीवर येऊन म्हणालों.

— "नको कुसुमाकर, असा निष्ठुर नको रे होऊंस ! तुझ्या प्रेमासाठीं जी आपल्या प्राणावरही तिलांजली द्यायला तयार आहे, तिच्यावर-ह्या तुझ्या लाडक्या नंदिनीवर, असा भलताच पेंचाचा प्रसंग तूं आणावास ना ? कुसुमाकर, जरा धीर धर. हा माझ्या आयुष्यांतील माझ्या दृष्टीनं, प्रत्येक आयस्त्रीच्या दृष्टीनं, अत्यंत महत्वाचा प्रश्न असल्यामुळं त्या बाबतींत जरा विचार करायला मला थोडा अवधी द्यावास अशी माझी तुला विनंति आहे."

— क्षणभर कसला तरी विचार कायम करून ती मला पुढं म्हणाली,

— "उद्यां रात्रीं बरोबर बारा वाजल्यानंतर तूं याच वेळीं, आमच्या बंगल्याच्या बाहेरील रस्त्यावर येऊन उभा रहा." आणि

एका विशिष्ट खिडकीकडे बोट दाखवून ती म्हणाली, "...जर त्या खिडकींत त्या हिरव्या कांचेच्या तावदानांतून तुला पेटलेल्या मेण-बत्तीचा प्रकाश दिसेल, तर तुझी ही विनंति मान्य करायची माझ्या मनाची तयारी झाली असं समजून तूं सरळ आमच्या घराच्या पायऱ्या चढून त्या खोलींत यावंस." इतकं बोलून तिनं मला काल निरोप दिला होता.व आज त्याप्रमाणं त्या घराच्या माडीवरील खिड-कींत पेटलेली मेणबत्ती केव्हां दिसेल त्याची मी वाट पहात आहें....

असें म्हणून, जवळ जवळ माझें अस्तित्वच विसरल्यासारखें करून कुसुमाकर त्या खिडकीकडे एकाग्र नजरेनें पाहूं लागला.

इतक्या अवकाशांत त्या बंगल्याच्या एका विशिष्ट खिडकींत एकदम मेणबत्ती पेटली गेली आणि त्या कांचेच्या तावदानांतून तिचा फिक्कट हिरवा प्रकाश दिसूं लागला.

तो प्रकाश दृष्टीस पडतांच कुसुमाकर एकदम आनंदातिशयानें माझ्या दंडाला डिंवचून म्हणाला,

—पाहिलास मनोहर तो प्रकाश? आतां तुझी रजा घेणं मला भाग आहे. कृपा करून मला आतां निरोप दे. वाटल्यास ही माझी मोटार घेऊन तूं तुझ्या बिऱ्हाडाकडे जा. उद्यां सकाळीं सहा वाजण्याच्या पूर्वींच मी तुला येऊन भेटेन. हं! समजलं ना?

यावेळीं माझ्या डोक्यांत अनुकूल प्रतिकूल विचारांची एकच गर्दी झाली. अशा परिस्थितींत माझें खरें मित्रकर्तव्य कोणतें, याचा क्षणभर मला उमज होईना. पण शेवटीं एक विचार मी कायम केला आणि एकदम कुसुमाकराच्या दोन्ही दंडांना धरून किंचित् हुकुमाच्या अन् निर्भत्सनेच्या स्वरांत मी त्याला म्हटलें,

—कुसुमाकर, किती पागल आहेस रे तूं? तुझी मनोवृत्ति इतकी हिणकस असेल असं आतांपर्यंत नव्हतं वाटलं मला! त्या देवतातुल्य नंदिनीचं पातिव्रत्य, शील, तुला इतकं कां क्षुद्र वाटलं? कुसुमाकर, जरा विचार कर! तुझं नंदिनीवरील प्रेम खास इतकं

उथळ नाहीं. तूं नको सांगायला मला! पण खरोखरच तुमचं प्रेम किती शुद्ध नी उदात्त आहे त्याची मला पूर्ण जाणीव आहे. असं असतां क्षणिक क्षुद्र विकाराच्या आधीन होऊन त्या निष्कलंक प्रेमाला असा कधींहि न पुसला जाणारा काळाकुट्ट डाग जाणून-बुजून लावावास ना?—

—स्त्रियांच्या आयुष्यांत त्यांच्या अधःपतनाची घटका केव्हां तरी एकदां येत असते. ती घटका टळली, तिच्यावर विजय मिळवितां आला, म्हणजे पुढं तिला केव्हांहि भिण्याचं मुळींच कारण नसतं. नंदिनीला ह्याक्षणीं स्वतःचं निराळं अस्तित्व उरलेलं नाहीं. तर तें तुझ्या अभिलाषांत गुरफटून गेलं आहे. ती केवळ यंत्रवत् बाहुली बनली आहे. तिचा उद्धार करणं किंवा तिला अधोगतीला नेणं हें आतां केवळ तुझ्याच हातांत आहे.

माझ्या ह्या अनपेक्षित सरबत्तीनें कुसुमाकाराची धुंदी हळुहळू उतरत असलेली मला दिसली. त्यानें विस्फारित नेत्रांनीं क्षणभर माझ्याकडे पाहिलें आणि मान खालीं घातली.

माझ्या भाषणाचा इष्ट तो परिणाम होत चाललेला पाहून चट्कन् मी पुढें म्हणालों,

—कुसुमाकर, पहा! तुझ्या नेहमींच्या निष्पाप नजरेनं पहा त्या दिव्याच्या प्रकाशाकडे! तुझी इच्छा असेल तर एका क्षणांत, ह्या भीषण, पातक्या रात्रीं, नाना मोहप्रसंगांपासून कठोर संयमानं पदोपदीं रक्षण करून जीवापाड जपलेल्या, आपल्या प्रियतम पातिव्रत्याचा, केवळ तुझा रोष होऊं नये, तुझ्या प्रेमाला आपण मुकूं नये, म्हणून त्याचा बळी द्यावयास आज नंदिनी तयार झाली आहे, हें त्या हिरव्या प्रकाशांत तुला नाहीं का दिसत?...

—प्रत्यक्ष आपल्या हातानीं चिलयाला कांडतांना त्याच्या आई-बापांची जी विदारक मनःस्थिति झाली होती, तीच स्थिति आज, त्या गरीब प्रेमवेड्या, भावनाप्रधान नंदिनीची झाली असेल!...

—कुसुमाकर, तुझ्यापुरतंच तूं पहातोस! तिच्या मनःस्थितीचा, तिच्या भावनांचा जरा तरी तूं विचार केला आहेस का? असं पहा, आतां क्षणभर निरुपाय म्हणून नंदिनीनं मारून मुटकून तयार केलेल्या आपल्या मनाची तात्पुरती तयारी चिरकाल टिकेल असं का तुला वाटतं? चुकतोस तूं! उद्यां तृप्त अंतःकरणानं अन् समाधानानं तिच्या घरांतून तू बाहेर पडशील! पण तुझ्या अपरोक्ष, घडून गेलेल्या कृत्याबद्दल दारुण पश्चात्तापाच्या आगीनं तिचं हृदय कसं जळूं लागेल, त्याच्या कशा चिंधड्या चिंधड्या उडतील याचा थोडा तरी विचार तूं केला आहेस का? कुणी सांगावं! हृदयाच्या आत्यंतिक, सतत बोचणीनं तिला कदाचित् क्षय लागेल! किंवा मनाची तळमळ असह्य होते म्हणून, तिच्या हातून आत्महत्याही घडणं शक्य आहे....

— कुसुमाकर, तुझं तिच्यावर प्रेम आहे म्हणतोस तें हेंच का? तिच्या हृदयांत पेटलेल्या ज्वालांवरच तुझा कामुक ग्रास तयार व्हावा ना? नंदिनीच्या उदात्त, अलौकिक व दिव्य प्रेमापुढं, तुझ्या प्रेमाचा कस किती हीण लागत आहे हें मी तुला आणखी पटवून द्यायला का हवं?

मी बोलतां बोलतां एकदम थबकलों. कुसुमाकाराचा क्षीण हुंदका मला ऐकूं आला. इतक्यांत त्यानें बसल्या जागींच माझ्या कंबरेला मिठी मारली; आपलें तोंड माझ्या कुशींत खुपसलें आणि एखाद्या लहान मुलाप्रमाणें तो स्फुंदस्फुंदून रडूं लागला.

मी एकदम वरमूनच गेलों. इतक्या निष्ठुरतेनें मी त्याला वाक्ताडन करायला नको होतें असें मला चटकन् वाटलें व त्याला रडतांना पाहून माझ्या डोळयांत अश्रू थरारले. मी हळूच त्याला जवळ घेऊन प्रेमळ आवाजांत म्हटलें,

—कुसुमाकर, असं रे काय करतोस वेड्यासारखं? हं! उगी ना! हें पहा, क्षमा कर मला माझ्या बोलण्याची! तुला मुद्दाम दुखवावं असा माझा मुळींच हेतु नव्हता. राग का आला माझा तुला?

इतकें बोलून मी त्याचें मस्तक हळूच वर उचललें.

—नाहीं. मनोहर, तुझ्यावर मी मुळींच रागावलेलों नाहीं. तूं खरोखर देवमाणूस आहेस. माझं घडूं पहाणारं अधःपतन तूं आज टाळलंस व माझ्या आवडत्या, देवतातुल्य नंदिनीच्या प्रेमाचं खरं स्वरूप मला उघड करून दाखवलंस!

असें म्हणून त्यानें मला कडकडून मिठी मारली.

आणि थोडयाच वेळानें आम्ही दोघेही कुसुमाकराच्या बेबी ऑस्टीनमधून तेथून पसार झालों. त्यावेळीं मोटारीच्या पाठीमागून मी सहज पाहिलें तों, नंदिनीच्या माडीवरील त्या खिडकीच्या कांचेच्या तावदानांतून, त्या पेटलेल्या मेणबत्तीचा फिक्कट हिरवा प्रकाश जवळच्याच एका निष्पर्ण झाडावर मंद पणें परावर्तित होत होता.

———

हिरवा प्रकाश—अप्रकाशित.

व्यं. अ. पै रायकर

# वणव्यांतील फूल

प्रिय डॉक्टर !

माझा अंतकाल इतका जवळ आला नसता, तर हें पत्र लिहिण्याचं धाडस माझ्याकडून कधींही झालं नसतं ! आणखी थोड्याच दिवसांनीं या जगाचा कायमचा निरोप घेऊं पहाणारी एक कमनशिबी स्त्री आपणास सांगत आहे, कीं कृपा करून हें पत्र आपण सहानुभूतीनं वाचा आणि ती मागत असलेली भिक्षा तिला घाला.

महाराज ! केवळ माझ्या नांवावरून आपण मला ओळखणं शक्य नाहीं. एवढंच नव्हे, तर मी सांगत असलेल्या खाणाखुणा व प्रसंग यांवरून तरी माझी आपल्याला ओळख पटेल किंवा नाहीं याची शंकाच आहे. जग हें इतकं विशाल आहे, कीं तिथं सर्व गोष्टींचा कसा चटकन् विसर पडतो.

'सेन्ट जोझेफ हॉस्पिटल'च्या सातव्या नंबरच्या खोलींत राहून मी हें पत्र आपणास लिहित आहें. आज तीन आठवडे झाले, एका कॉटवर असाध्य दुखण्यानं जर्जर होऊन मी पडलें आहें. डॉक्टरांनींही पण माझ्या जीविताची आशा केव्हांच

सोडलेली आहे. आणि मी इतकी अशक्त झालें आहे, कीं हे शब्द लिहिण्यास सांगतांना, त्या श्रमानंच माझं सर्वांग घामानं अगदीं डबडबून गेलं आहे.

फार तर चार पांच दिवसांपेक्षां माझं आयुष्य अधिक नाहीं; तेव्हां हें पत्र आपण अखेरपर्यंत सहानुभूतीच्या दृष्टीनं वाचावं अशी अंतकाळची माझी आपणाला हात जोडून विनंति आहे. आणि आपला अमूल्य, महत्त्वाचा वेळ मी घेत आहें, याबद्दल आपण मला क्षमा करावी.

त्या गोष्टीला आज आठ वर्षं झालीं असतील ! एक दिवस, एक गरीब स्त्री—असेल वय चाळीस पंचेचाळींसच्या दरम्यान—आपल्या घरीं गेली आणि एका रोग्याला पाहण्यास चलण्याबद्दल आपणाला आर्जवूं लागली; तेव्हां ' सध्यां आपण प्रॅक्टीस करीत नाहीं ' असं सांगून गांवांतील इतर डॉक्टरांच्याकडे जाण्याचा गोड शब्दांत आपण तिला सल्ला दिला; पण त्या गरीब स्त्रीनं, आपणच यावं म्हणून, अशा कांहीं हृदयद्रावक शब्दांनीं आपली विनवणी केली, कीं तिची दया येऊन लगेच आपण डोक्यावर हॅट चढविली, औषधांची बॅग हातांत घेतली आणि तिच्याबरोबर निघालां.

एका अत्यंत साध्या नी लहानशा झोपडीवजा घरांत आपण मग तिच्याबरोबर गेलांत. भर दिवसासुद्धां जिथं दिव्याची जरूरी आहे अशा एका कोंदट खोलींत, एक म्हातारा कॉटवर बसून खोकत होता अन् रक्त थुंकीत होता; व त्याच्या शेजारींच बसून, एक पंधरा सोळा वर्षांची, विशाल अन् निळ्या डोळ्यांची नी किंचित् श्यामवर्णाची स्वरूपसुंदर मुलगी मूकभावानं अश्रू गाळीत होती.

त्या म्हाताऱ्याला आपण काळजीपूर्वक तपासून पाहिलें; त्याच्या आजाराचीं लक्षणं आस्थापूर्वक विचारून घेतलीं अन् त्याच्याशीं

असं गोड नी प्रेमळ संभाषण केलं, कीं त्यामुळं तिथं असलेल्या सर्वांचीं अंतःकरणं सद्गद्गित होऊन गेलीं; आशा, उत्साह, आनंद यांनीं सभोंवतालचं वातावरण अगदीं भरून गेलं.

दुसऱ्या दिवशींही आपण फिरून तिथं गेलां; तसंच तिसऱ्या, चवथ्या दिवशींही! आणि प्रत्येक दिवशीं, ज्या क्षणाला आपण त्या रोग्याच्या खोलींत प्रवेश करीत होतां, त्या क्षणापासून तों आपण तिथून निघून जाईपर्यंत ते निळे डोळे, तेच विशाल न् सुंदर डोळे अश्रूंनीं डबडबलेल्या स्थितींत, आपल्या प्रेमळ मूर्तीकडे कृतज्ञतेनं, प्रेमानं एकसारखे लागत असत.

एके रात्रीं नाटकाला गेल्यामुळं आपण बऱ्याच उशीरां तिथं पोंचलांत; त्यावेळीं आपल्या कोटाच्या बटनहोलला एक गुलाबाचं टपोरं फूल लोंबकळत होतं व आपला सुंदर चेहरा आनंदी अन् हंसतमुख दिसत होता.

नेहमीप्रमाणं आपण रोग्याला पाहिलं. आपली मुद्रा विशेष खुलली. कारण रोगी बरा झाला होता. आपण मग हंसून म्हटलें,

—आतां काळजीचं मुळींच कारण नाहीं; रोगी साफ बरा झाला!

तें ऐकून निळया डोळयांच्या त्या बालिकेनं सुटकेचा एक दीर्घ निश्वास सोडला; हलकेच पुढं होऊन तुमच्या हाताचं चुंबन घेतलं आणि गहिंवरलेल्या आवाजांत कृतज्ञतेनं म्हटलं,

—दोतोर, आपले हे उपकार आम्हां गरिबांच्या हातून कसे बरं फिटतील?

त्यावेळीं डॉक्टर, आपण हळूंच वांकून तिच्या पाठीवरून, केसांवरून प्रेमभरानं हात फिरविला अन् एखाद्या लहान मुलीला समजावितात तशा अभिनयानं म्हटलं,

—मुली, मला तुमच्याकडून कांहींही नको आहे. फक्त तुम्ही माझी आठवण ठेवली म्हणजे झालं!

हें बोलतांना आपल्या बटनहोलला असलेलं तें गुलाबाचं फूल चटकन् खालीं पडलं व तिनं मग तें तुम्हाला नकळत उचलून घेतलं.

डॉक्टरसाहेब, तुम्हाला ठाऊक आहे का, ती मुलगी कोण होती तें?...ती...मी...मीच होतें!

ज्या शेवटच्या दिवशीं तुम्ही आमच्याकडे येऊन गेलांत, त्यानंतर अजूनपर्यंत तुम्हांला कधीं पहाण्याचं भाग्य फिरून मला लाभलेलं नाहीं. तरी पण, मी माझ्या वडिलांच्या पवित्र आत्म्याची शपथ घेऊन सांगतें, कीं तुम्हांला यशलाभ व्हावा, तुमची भरभराट व्हावी, तुम्ही सुखांत असावं म्हणून देवाची अनन्य भावानं प्रार्थना करण्यास मी कधींहि चुकलें नाहीं.

ह्या शेवटच्या आठ वर्षांत अनेक हाल आपत्तींत, त्रासांत खितपत राहून दिवस कंठीत असतांनाहि, आपलं नांव व आपली प्रेमळ मूर्ति माझ्या स्मृतींतून, अंतःकरणांतून कधींच नष्ट झाली नाहीं.

आपल्या दिव्यौषधानं खडखडीत बरा झालेला माझा म्हातारा बाप, त्यानंतर एका वर्षानं, अकस्मात् छातींत जोराची कळ येऊन निधन पावला. आमच्यावर आभाळ कोसळून पडलं आणि त्या आघातानं आम्हीं अगदीं जमीनदोस्त झालों.

दारिद्र्यानं लाचार होऊन, निकट परिचयाच्या कितीतरी सधन इसमांकडे आम्ही दयेची याचना केली; पण ती निष्फळ ठरली!

आणि अखेरीस, परिस्थितीच्या दारुण कचाट्यांत सांपडल्यामुळं रस्त्यावरून भिक्षा मागतांना, एका श्रीमंत व विलासी तरुणाकडून बेफामपणें सुटलेल्या मोटारीनं माझ्या दुर्दैवी आईचा एके दिवशीं बळी घेतला!

या अफाट जगांत मी एकटी, निराधार झालें. दया, सहानुभूति, पैसा यांच्या अभावामुळं, एखाद्या सुकाणू नसलेल्या नौकेप्रमाणं माझी स्थिति झाली व सरतेशेवटीं मी नकळत पतिता बनलें.

मानवी स्वभावाची क्रूरता, निर्घृणपणा, याची मला पुरेपूर ओळख पटली. निराधार, गरीब स्त्रीच्या आयुष्यमार्गावरील कांट्याकुट्यांनीं मला रक्तबंबाळ करून सोडलं. मायावी, ढोंगी जगाच्या विषारी अन् दाहक स्पर्शांनीं मी अंतर्बाह्य होरपळून निघालें.

अखेरीस मी इतकी अधःपतित झालें, कीं नुसता, तुमच्यासंबंधीं विचार करीत रहाणं किंवा तुमच्या प्रेमळ सहवासांतील आठवणी काढून मनसोक्त अश्रू गाळणं, म्हणजे आपल्यासारख्या एका वंद्य, पवित्र माणसाला मी कलंकित करणं होय, असं मला वाटूं लागलं. आणि म्हणूनच, माझ्या हृदयांत स्थिर झालेली तुमची प्रतिमा दूर करण्याचा, तुम्हाला विसरण्याचा, मी शिकस्तीचा प्रयत्न केला; पण व्यर्थ! तें अशक्य झालं मला! उलट उत्तरोत्तर आपल्या स्मृतीची ज्योत माझ्या अंतःकरणांत अधिकाधिक प्रज्वलित होऊं लागली; एवढंच नव्हे, तर प्रत्येक वेळीं, प्रत्येक तासाला, प्रत्येक क्षणाला मला आपलं तें गोड स्मित, आपली मनोहर मूर्ति माझ्या अंतःचक्षूंपुढें दिसूं लागली. आणि जणुं काय ती मला धीर देत आहे, सहाय्य करण्यास येत आहे असा भास मला होऊं लागला.

माझ्या ओठांत, अंतःकरणांत फक्त तुमचंच नांव नाचत होतं; केवळ तुमचीच आठवण सांवलीप्रमाणं माझ्याबरोबर फिरत होती आणि ती मला हें दुःख, हे त्रास सहन करण्यास आत्मिक बल देत होती.

माझा मृत्यु अगदीं समीप येऊन ठेपल्यामुळं सर्व कांहीं उघड्या अंतःकरणानं विदित करण्यास मला आतां संकोच वाटत नाहीं. जवळ जवळ माझी सांवलीच आतां तुमच्याकडे बोलत आहे.

एकेकाळीं निष्पाप असलेल्या सुंदर बालिकेनं, पण आतां दुर्दैवी, पतिता बनलेल्या या स्त्रीनं, सारं आयुष्य आपणाशीं सहधर्मिणीच्या नात्यानं घालविण्याची वेडी, भ्रामक, अविचारी आशा मनांत सतत बाळगल्याबद्दल मोकळ्या अंतःकरणानं आपण तिला एकवार क्षमा करा.

तरी पण मला वेडीला अजूनही असा सुखद भास होत आहे, कीं माझे डोळे कायमचे मिटले जाण्यापूर्वी एकदां तरी तुम्हाला डोळे भरून पहाण्यास मला मिळेल ! तुमच्या पवित्र देहाचा स्पर्श मला होईल !

डॉक्टरसाहेब, माझी तुम्हांला अखेरची एकच विंनति आहे कीं, आपण एकवार, फक्त एकच वेळ इथं येऊन जावं !

तुम्हाला पाहाण्याची, तुमच्या पवित्र हाताचं चुंबन घेण्याची आणि माझ्याकडे असलेला, जीवापाड जपलेला एक शेवटचा दागिना आपल्या हातीं देण्याची मला फार फार तळमळ लागून राहिली आहे. हा दागिना म्हणजे आठ वर्षांपूर्वी आपल्या कोटाच्या बटनहोलमधून पडलेल्या त्या गुलाबाच्या फुलाचा अवशेष होय !

मी अखेरचा श्वास सोडण्यापूर्वी एक मिनिट, एक क्षणभर तरी तुम्हाला डोळे भरून पाहाण्यास मला मिळेल तर माझ्यासारखी भाग्यवान मीच असं मी समजेन !

मग डॉक्टरसाहेब, याल ना तुम्हीं ? गुडघे टेंकून, अगदीं रडत रडत मी ही याचना करीत आहें; तरी नाहीं म्हणून माझं अंतःकरण तुडवूं नका ! लाथाडूं नका ! !

जर तुम्ही यायला उशीर लावाल, तर मी तुम्हांस जिवंत भेटणं कठीण होईल ! कृपा करून लवकर या ! अगदीं पंचप्राण कंठांत आणून मी आपली वाट पहात राहिलें आहें.

आपली दुर्दैवी

ल्यूसी— *

---

* सुप्रसिद्ध पोर्तुगीज कथालेखक Julio Dantas यांच्या एका गोष्टीवरून.

———

वणव्यांतील फूल–अप्रकाशित

व्यं. अ. पै रायकर

# कुचंबणा

वसंताच्या एकुलत्या एक बहिणीचा-गौरूचा-तो लग्नदिवस होता. घरभर सारी मंडळी कसल्या ना कसल्या तरी व्यवहारांत गढून गेली होती. लग्नाच्या निमित्तानें यावेळीं वसंतची नातलग मंडळी बायकामुलांसह एकत्र झाली होती. त्यामुळें बायकांच्या गप्पागोष्टींना व मुलांच्या हंसण्याखिदळण्याला जणुं ऊत आला होता.

माडीवरच्या पडदे, तसबिरी लावून शृंगारलेल्या भव्य दिवाण-खान्यांत कांहीं मंडळी, ग्रामोफोनवर निरनिराळे रेकॉर्ड्स् लावण्यांत दंग झाली होती. कांहीं जण एके ठिकाणीं पत्त्यांचे डाव खेळत होते. त्यांच्या गोल्डफ्लेक सिगारेट्स्च्या धुरानें व वासानें सारा दिवाणखाना भरून गेला होता. कारभारी लोक कुणाला तरी हाका मारण्याकरितां उच्च स्वरानें वारंवार ओरडत होते.

एवंच, सर्व वातावरण सात्त्विक आनंदानें व उल्हासानें भरून गेलें होतें.

आतां तेल लावण्याकरतां वरपक्षाकडील बायका मंडळी याव-याची वेळ जवळ आल्यामुळें गडबडीला विशेष भर आली होती.

थोड्याच वेळांत बॅंडचे सुस्वर स्वर दुरून ऐकूं येऊं लागले. आपल्या सुंदर चेहऱ्यांना पावडर, क्रीम इत्यादि लावून सौंदर्यप्रसाधन करण्यांत तरुण स्त्रिया रंगून गेल्या. येणाऱ्या पाहुण्या बायकांसाठीं केलेल्या उपाहाराची व उठण्याबसण्याची तयारी कितपत व्यवस्थित झाली आहे तें प्रौढ स्त्रिया पुन्हां पुन्हां अजमावूं लागल्या. फॅशनेबल तरुण, आपल्या केसांचा भांग पाडण्यांत अन् परीटघडीचे शर्ट बदलण्यांत गर्क झाले.

'तेला'ची मंडळी आली. बॅंडच्या श्रवणमधुर आवाजांत नवरीस तिच्या भावी सासूनें आंब्याच्या पानानें तेल लावलें. अहेरादाखल हिऱ्याचीं कुडीं व जरीचें पातळ नवरीला अर्पण करण्यांत आलें.

वरपक्षाकडील आलेल्या बायकांच्या मुखावर नवरी पसंत पडल्याची समाधानाची छटा दिसूं लागली.

नवरीचा बंधु या नात्यानें वसंत गौरुच्या शेजारींच उभा होता. त्यानें सिल्कचा ओपन कॉलरचा शर्ट अव्यवस्थितपणें घातला होता. घामानें शर्टचा कांहीं भाग भिजून चिंब झाल्यामुळें त्याच्या भरीव छातीचा सुंदर गोडपणा व्यक्त होत होता. तो जरा काळासांवळाच होता, तथापि त्याची मुद्रा सतेज अन् आकर्षक दिसत होती. शर्टचे हात त्यानें कोपराच्यावर दुमडले होते. पांढऱ्या तलम धोतराचा सोगा खांद्यावर कसा तरी टाकला होता. सोन्याच्या सांखळीचें झेनिथ रिस्टवॉच मनगटावर शोभून दिसत होतें.

जमलेल्या बायकामंडळींत 'नवरीचा भाऊ' 'नवरीचा भाऊ' अशी मंदस्वरांत कुजबुज झाली.

वसंतानें आपली नजर स्त्रीजमावावर फिरविली.

दोन निळसर नि विशाल डोळे त्याच्या मुखावर प्रेमार्द्रतेनें स्थिर झालेले त्याला दिसले.

नजरेला नजर भिडतांच ते सुंदर डोळे चटकन् खालीं झाले. पण वसंत आपली नजर तिच्यावरून काढूं शकला नाहीं.

मान खालीं घातल्यामुळें तिचा भरदार अंबाडा, गौरवण मासल मान त्याला लोभनीय वाटली. निळया शालूचा भरजरी पदर तिच्या मानेजवळ शोभून दिसत होता.

उभ्या आयुष्यांत स्त्रियांबद्दल एवढें जबरदस्त आकर्षण वसंताला कधींच वाटलें नव्हतें.

त्यानें लोकांची नजर चुकवून तिच्याकडे किती तरी वेळां मंत्रमुग्ध दृष्टीनें पाहिलें व तिचीहि पण तीच कृति चालत असल्यामुळें त्यांनीं परस्परांस पूर्णपणें आकर्षित केलें.

इतक्यांत पाहुण्या बायकांना, उपाहाराचीं ताटें मांडून ठेवलेल्या दिवाणखान्यांत नेण्यांत आलें व वसंत जवळच्याच एका खुर्चीवर बसून, विमनस्कपणें कोठें तरी पहात विचार करूं लागला.

गळयांतील मंगळसूत्रावरून ती बालिका विवाहित असल्याचें त्याला तेव्हांच कळून चुकलें होतें; म्हणून आपल्या मनावर विजय मिळविण्याचा त्यानें कमालीचा प्रयत्न केला. पण तिची मूर्ति त्याच्या हृदयांत स्थिर झाल्यामुळें त्याचा नाईलाज झाला.

वसंत नीतिमान् तरुण होता. त्याच्या वयाला तेवीस चोवीस वर्षें होत आलीं होतीं; आतांपर्यंत स्त्रीसौंदर्यानें वा प्रेमानें त्याचें हृदय कधींच विचलित होऊं शकलें नव्हतें. पण आज त्याच्या आयुष्यांत एकदम क्रांति घडून येत होती.

बँडचें वाद्य पुन्हां सुरू झालें. वरपक्षाकडील आलेल्या बायकांची परतण्याची तयारी झाली.

उभयतांचे जीव परस्परांसाठीं वरखालीं होऊं लागले.

जाण्याची वेळ जवळ ठेपल्यामुळें तिचे डोळे प्रेमार्द्र दिसत होते. तिची करुण दृष्टि वसंताच्या हृदयाचा जणूं ठाव घेत होती.

बायका भराभर मोटारींत जाऊन बसल्या. आल्याबरोबर घरांत शिरण्यापूर्वी दासीकडे दिलेल्या आपापल्या शाली मोटारींत बसतांना परत घेऊन त्या त्यांनीं खांद्यावरून घेतल्या.

मे महिन्यांतील ऐन दुपारची वेळ. उकाडा असह्य झाला होता. सारी जीवसृष्टि सूर्याच्या प्रखर तापानें नुसती भाजून निघत होती. जमिनींतून उष्ण निश्वास बाहेर पडत होते.

आठदहा लहान लहान उघड्या मोटारींत बसलेल्या स्त्रियांचे ते चित्रविचित्र रंगाचे भरजरी शालू नि अंगावरून घेतलेल्या शाली सूर्याच्या किरणांनीं मजेदार रीतीनें चमकत होत्या.

...पण वसंतचें सारें लक्ष त्या तरुण स्त्रीकडे केंद्रित झालें होतें. अनिमिष नेत्रांनीं तो तिच्याकडे पहात होता. आणि तिची प्रेमळ स्निग्ध नजर त्याच्या मुखावर वारंवार स्थिर होत होती.

मोटारी हलके हलकेच चालू झाल्या आणि थोड्याच वेळांत त्या साऱ्या दृष्टीआडहि झाल्या.

...आणि वसंत खिन्न उदास अंतःकरणानें घरांत शिरला.



मोटारींत बसलेल्या वसंताच्या चेहऱ्यावर आनंद, उत्सुकता यांची दाट छाया पसरल्याचें यावेळीं त्याच्याकडे पाहिलें असतां, कोणाच्याहि लक्षांत सहजच येण्यासारखें होतें.

आज पहिल्यानदांच तो मेहुण्याच्या व बहिणीच्या प्रेमळ अत्याग्रहाच्या निमंत्रणावरून त्यांच्याकडे डिसेंबरच्या सुटींत चालला होता.

त्याचा पोशाख अगदीं अपटुडेट होता. त्याच्या रुबाबदार, सडपातळ नी नाजूक देहाला त्यानें घातलेला पिंवळसर सिल्कचा सूट अगदीं अप्रतिम दिसत होता. फेल्टची निळसर रंगाची हॅट डोक्यावर न बसवतां आपल्या मांडीवरच त्यानें ठेवून दिली होती.

मोटार अगदीं भरवेगांत चालली होती. वसंतनें आपली नजर बाहेर फिरविली.

उजव्या बाजूस ऐसपैस शेतांत नुकतेंच वाढलेलें हिरवेंचार वायंगण+ एखाद्या मोठ्या गालिच्याप्रमाणें मनोवेधक दिसत होतें. शेताच्या मध्येंच असलेल्या अरुंद बांधावर नारळीच्या उंच उंच झाडांची रांग कितीतरी सुंदर दिसत होती. शेताच्या कुणग्याकुणग्यानीं बसलेले पांढरे शुभ्र बगळे, मोटारीच्या आवाजाबरोबर दचकून उठत, आकाशांत थोडा वेळ घिरट्या घालीत, अन् पुन्हां त्या शेताच्या हिरव्या गर्द राईत अदृश्य होत.

झरझर मागें पडणारीं हीं दृश्यें, वसंत प्रफुल्लित दृष्टीनें पहात, कसला तरी गोड विचार मनाशीं करीत होता.

गौरूच्या लग्नाच्या वेळीं पाहिलेली ती तरुण मुलगी आपणास तिथें कदाचित् पुन्हां पहायला मिळेल ही गोड आशा त्याच्या मनांत आनंदाचें साम्राज्य निर्माण करायला पुरेशी होती.

गौरूच्या लग्नदिवसापासून वसंताला त्या तरुणीच्या चिंतनावांचून अन्य कसलेहि विचार सुचत नव्हते. आपलें सारें अंतःकरण त्यानें त्या अपरिचित तरुणीस केव्हांच अर्पण करून टाकलें होतें.

......व आतां मोटारींत बसल्यापासून त्याच्या प्रेमाला भरती आली होती.

वसंत अजून अविवाहित होता. यंदां तो मेडिकल कॉलेजच्या दुसऱ्या वर्षांत असून कोर्स पुरा झाल्याशिवाय आपण लग्नाच्या भानगडींत पडणार नाहीं असें त्यानें आपल्या वडिलांस अप्रत्यक्ष रीत्या कळविलें होतें.

थोड्याच वेळांत मोटार बांदिवडेस पोंचली. तिचा हॉर्न वाजल्याबरोबर, कोण आलें आहे हें पहाण्याकरितां घरांतील कांहीं मंडळी कुतूहलानें बाहेर आली.

कसल्या तरी संभ्रमित मनःस्थितींतच वसंत मोटारींतून खालीं उतरला.

---

+ भाताचें खरिपाचें पीक.

—कसं काय वसंत! वाट चुकलास वाटतं?—त्याचा मेहुणा विनायकराव यानें पुढें होऊन हंसत हंसत म्हटलें.

—वाः! तर मग ही इष्टापत्तीच म्हणायची! अशीच माझी वाट नेहमीं चुकेल तर त्यांत मला आनंदच आहे.

इतकें बोलून त्यानें आपली नजर सहजच वर केली. अन् विशिष्ट ठिकाणीं नजर पडतांच त्याचे विशाल नी भेदक डोळे विलक्षण तेजानें तळपूं लागले.

गौरूच्या लग्नदिवशीं त्याचें अंतःकरण बळकावून बसलेली ती तरुण मुलगी बल्कांवावरच्या* दारावरच उभी राहून, सहास्य मुद्रेनें नी प्रेमार्द्र तंद्रीनें त्याच्याकडे टक लावून पहात होती.

—वसंत, चल जाऊं या ना आंत?—असें म्हणून विनायकरावानें त्याचा हात आपल्या हातांत घेतला व त्याला आंत नेलें.

खोलींत जाऊन वसंतानें पायांतील बुटांचे बंद सोडण्यास सुरवात केली. इतक्यांत गौरू त्या तरुण स्त्रीबरोबर आंत आली व म्हणाली,

—वसंत, कसं काय? खुशाल आहेस ना?

—कोण! गौरू? वाः! ओळख आहे म्हणायची तर?—वसंत आपली मान वर उचलून हंसत हंसत म्हणाला.—काय विचारतां? नव्या राज्यांत, नव्या संसारांत प्रेमाच्या नव्या माणसांत आल्यावर, आपल्या पूर्वीच्या माणसांची ओळख तुला रहाते कीं नाहीं याची मला दाट शंका होती.

—इश्श! असं कुठं होतंय वाटतं?—गौरू मान वेळावून म्हणाली.

वसंत जरी गौरूशीं बोलत होता तरी त्याचे डोळे त्या तरुणीच्या प्रेमळ नजरेला उत्तर देत होते. इतक्यांत चट्कन् गौरू म्हणाली,

---

* बल्कांव = गोमंतकांतील बहुतेक घरांना बसण्याउठण्याकरतां ओटीसारखा बांधलेला घरचा दर्शनी भाग.

—वसंत! हिला तूं ओळखतोस का? ही माझी नणंद बरं! वाळपईच्या नार्वेकर घराण्यांत हिला दिली आहे. हिचं लग्न माझ्या लग्नाच्या पूर्वी सहा वर्षे अगोदर झालेलं असलं तरी ती माझ्यापेक्षां सहा महिन्यांनीं लहानच आहे!

खिन्न अंतःकरणानें पण आतुरतेनें वसंत ही हकीकत ऐकत होता. तथापि चेहऱ्यावर त्यानें लटकेंच हंसूं आणलें होतें.

जरा थांबून गौरू पुढें म्हणाली, —आणि हिचं नांव, तिच्या रूपाप्रमाणंच मोहक अन् सुंदर आहे.

—इश्श! पुरे ग वहिनी! तुझं आपलं कांहीं तरीच!— असें म्हणतांना तिचे गाल आरक्त झाले. आणि तिनें आपली मान शालीनतेनें खालीं घातली.

—अस्सं! काय बरं यांचं नांव?—वसंतनें उत्सुकतेनें प्रश्न केला.

—मोहिनी. आहे कीं नाहीं सुंदर नांव?

—फार गोड अन् यथार्थ आहे नांव.एका निमित्तानं यांची ओळख झाली म्हणायची तर!—वसंत मोहिनीकडे दृष्टिक्षेप करीत म्हणाला.

—मोहिनी! तूं आतां वसंतला लाजण्याचं कांहींच कारण नाहीं बरं!—इतकें बोलून गौरूनें वसंताच्या हातांतील पुस्तकाकडे पाहून म्हटलें,

—कसलं रे तें पुस्तकं?

—हें होय? प्रो. फडक्यांची नवी कादंबरी 'काश्मिरी गुलाब.' छान आहे ही कादंबरी!

—बरं झालं; तुला माहित आहे का वसंत? आमच्या मोहिनीला वाचनाचा भारी नाद! लघुकथा अन् कादंबऱ्यांचा छंद तिला विलक्षण आहे. आणि विशेष म्हणजे तुझ्या गोष्टींनीं तिला मनस्वी वेडं केलं आहे. परवां दिवाळींत प्रसिद्ध झालेला तुझा कथासंग्रह, तर तिच्या अत्यंत आवडीचा होऊन बसला आहे.

—अस्सं का ? तर मग माझ्या श्रमाचं, कलेचं सार्थक झालं म्हणायचं मोहिनीबाई ! तुमच्या या सहानुभूतीबद्दल मी आपला फार आभारी आहें.

—इश्श ! तुम्ही आमच्या वहिनीचं सगळंच कांहीं खरं मानूं नका ! तिला कीं नाहीं, कसलीहि गोष्ट फुगवून सांगण्याची कला फार छान साधलेली आहे.—जरा थांबवून मोहिनी पुढें म्हणाली, —आणि असं पहा. मोहिनीबाई असं ऐकण्यापेक्षां, आपल्या तोंडांतून नुसतं मोहिनी असं ऐकण्यांत मला विशेष आनंद होईल.

इतक्यांत विनायकराव तिथें आले आणि त्यांचें बोलणें त्यावेळीं तितक्यावरच राहिलें.



त्यानंतर जवळ जवळ पंधरा वीस दिवस गुजरले. इतक्या अवधींत वसंत व मोहिनी यांचें सख्य बरेंच वाढलें होतें.

दररोज संध्याकाळच्या वेळीं विनायकराव, वसंत, गौरू व मोहिनी इतकी मंडळी बरीच लांबपर्यंत, जवळच्याच टेंकडीवर फिरायला जात व परत फिरेपर्यंत त्यांना केव्हां केव्हां अंधारही पडे.

एखादे वळीं विनायकरावांना सवड नसली तर हीं तिघेंच निघा-यचीं; अन् कधीं कधीं वसंत व मोहिनी हीं दोघेंच फिरायला जात.

गौरूच्या घरची सारी मंडळी फार प्रेमळ नी मोकळ्या अंतः-करणाची होती. वसंताबद्दल सर्वांना एक प्रकारचा आदरयुक्त जिव्हाळा वाटूं लागला होता. आणि त्याचें रहाणें त्यांना फार आवडीचें झालें होतें. अशा स्थितींत त्याचा घरीं जाण्याचा बेत सर्वांच्या अत्याग्रहावरून हळू हळू पुढें सरकत चालल्यावर त्यांत नवल तें कसलें ? शिवाय मोहिनीची उत्कट ओढ त्याला तितक्याच प्रबलतेनें आपल्या घरीं जाऊं देत नव्हती.

आणि मोहिनी खरोखरीच एक रत्न होतें. परंतु दुर्दैवानें तें उकिरड्यावर पडलें होतें.

खानदानी बड्या घराण्याच्या नांवाला बळी पडून मोहिनीच्या वडिलांनीं, तिच्या वयाला चौदा वर्षें पुरीं होण्याच्या पूर्वीच, देवब्राह्मणांच्या साक्षीनें मोहिनीचा हात नार्वेकर घराण्यांतील एका श्रीमंत, पण व्यसनी, अशिक्षित, भावनाशून्य व कुरुप अशा इसमाच्या हातांत दिला होता.

सावलींत वाढणाऱ्या बिगोबीयांचें कुंडीभर झालेलें भरदार झाड उन्हाच्या प्रखर तापांत ठेवलें म्हणजे जसें हळुहळूं खुरटून जातें, तद्वतच मोहिनीची स्थिति झाली होती.

माहेरच्या माणसांनीं, एखाद्या फुलाप्रमाणें तिचें संगोपन केलें होतें. जन्मजात कलेची तिची आवड मोठ्या हौसेनें त्यांच्याकडून पुरविली जात असे. तिचीं निरनिराळीं कलाकुसरीचीं कामें पाहून तिचे आईबाप, बंधू, तिचें किती तरी कौतुक करीत. ती पेटी फार छान वाजवी. तिचीं बोटें पेटीच्या पट्टयांवरून हळुवारपणें फिरलीं म्हणजे तिच्यांतून निघणारे स्वर, श्रोत्याला एका उच्च व स्वर्गीय अशा निराळ्याच वातावरणांत घेऊन जात. एवंच एखाद्या हंसऱ्या फुलाप्रमाणें तिचें जीवन व्यतीत होत होतें.

...पण आतां तिच्यांत केवढा तरी फरक पडला होता. तिची विधवा सासू भारी खाष्ट असून ती नेहमीं आपल्या श्रीमंतीच्या तोऱ्यांत मिरवत होती. एक दिवस सुखाचा शब्द तिनें आपल्या सुनेला दिला नाहीं. तिथें गेल्यापासून मोहिनीच्या आयुष्याला एकदम विरुद्ध दिशा लागली. पेटीवादन किंवा इतर कलाकुसरीचीं कामें करणें, तिच्या सासूला मुळींच पसंत नव्हतें. फार काय पुस्तकें हातांतसुद्धां घेण्यास तिला अजिबात बंदी होती.

नवऱ्याचें सुख तर तिला पारखेंच होतें. सारा दिवस गांवांतील निरुद्योगी, कुटाळ व व्यसनी तरुणांच्या सहवासांत कुठें तरी पत्ते झोडीत किंवा गांवकुचाळक्या करीत असायचें हा मोहिनीच्या नवऱ्याचा उद्योग होता.

गांवांतल्या वेश्यांच्या घरांचे उंबरठे त्यानें झिजवून टाकले होते असें म्हटलें असतां अतिशयोक्ति व्हावयाची नाहीं.

कधीं कधीं रात्रीच्या रात्री त्यानें बाहेर काढाव्या व त्याची वाट पहात निराशेनें व अतीव दुःखानें नुसत्या जमिनीवर मोहिनीनें उपडी पडून रडत रात्री घालवाव्या, असें तिचें आयुष्य सुरवातीपासून चाललें होतें. तिच्या भावनांचा, आवडीनिवडींचा नुसता कोंडमारा होत होता व तो तिला दिवसेंदिवस असह्य होत चालला होता.

अशा स्थितींत असतांना गौरूच्या लग्नाच्या वेळीं पहिलेल्या दृष्टींत तिचें हरपलें श्रेय तिला दिसून आलें व त्याच वेळीं तिला नकळत तिच्या रिकाम्या अंतःकरणांत वसंताला जागा मिळाली.

आणि वसंताला मोहिनीच्या दुःखी आयुष्याची सारी माहिती गौरूकडून कळल्यापासून तिच्याविषयींच्या अनुकंपेनें त्याचें अंतःकरण भरून गेलें व तिच्याकडे त्याचें हृदय दुप्पट जोरानें ओढ घेऊं लागलें.

卐

आज वसंत व मोहिनी दोघेंच फिरायला निघालीं. विनायकराव सकाळींच कसल्याशा कामानिमित्त पणजीला निघून गेले होते व गौरू किंचित् आजारी असल्यानें घरींच राहिली होती.

वसंत आणि मोहिनी बोलतां बोलतां आपल्या नेहमींच्या त्या शोभिवंत टेकडीवर पोंचलीं आणि एका प्रशस्त शीलातलावर जाऊन बसलीं.

तेथून खालचा देखावा किती तरी मजेदार दिसत होता. कडाकडांनीं वळसे घेत जाणारी ती लहानशीच नदी, तिच्या दोन्ही बाजूला असलेलीं ती इफळीचीं दाट झुडपें, त्यांच्या मागें असलेला तो लांबच्च लांब बांध व त्यावरचीं तीं नारळीचीं झाडें, त्याला लगतच असलेलें

तें प्रचंड शेत आणि त्याच्या पलीकडे धूसर होत जाणारे एकाहून एक असे उंच उंच डोंगर; सारें कांहीं काव्यमय अन् सुंदर दिसत होतें.

सूर्यास्त होण्याला अजून अवकाश होता. तथापि उन्हाचा त्रास होत नव्हता. पश्चिमेकडचे, विशेषतः सूर्याच्या आजुबाजूस असलेले पांढरे शुभ्र ढग तप्त सुवर्णरस ओतल्याप्रमाणें चकाकत होते.

वसंतानें त्या समोरच्या देखाव्याकडे थोडा वेळ पाहिलें अन् मोहिनीकडे वळून तो म्हणाला,

—मोहिनी! परवां आमचं कॉलेज सुरू होणार आहे. मी उद्यां जाईन म्हणतों घरीं! संभाषणप्रसंगीं कांहीं कमीजास्त, थट्टेपरत्वें बोलून गेलों असल्यास माझ्यावर तूं राग धरणार नाहींस ना?

—म्हणजे! इतक्यांतच कंटाळा आला वाटतं आमचा?

वसंत आपल्याला दुरावणार या नुसत्या कल्पनेनेंच तिच्या अंगावर भीतीनें रोमांच उभे राहिले; तिचें हळुवार अंतःकरण हेलावलें; मुखावर घर्मबिंदू चमकूं लागले.

—वाः! तुझा कंटाळा आला म्हणून मी जात आहें असं खरोखरीच का तुला वाटतं?

मोहिनी गप्प राहिली. खालीं मान घालून आपल्या पदराच्या टोकाशीं ती चाळवाचाळव करूं लागली.

—मोहिनी! तूं अशी गप्प कां? माझा राग का आला तुला?

—छीः वसंत! तुझा आणि मला राग येणं शक्य तरी आहे का कधीं? तुझ्या सहवासांत हे पंधरा दिवस कसे झरझर निघून गेले तें कळलं सुद्धां नाहीं. जणुं काय वळवाची सरच!

—वळवाची सरच नव्हे तर काय! मोहिनी! तुझी व माझी अशी एकांतांत पुन्हां कधीं भेट होईल कोण जाणे! तुझ्याशीं असं मन मोकळेपणानं, मनसोक्तपणं बोलण्याची संधी फिरून

मला लाभेल याची काय खात्री ? म्हणून आज मी माझं हृदयाविष्करण तुझ्यापुढं करणार आहे; पण त्यामुळं माझ्याविषयीं तुझा भलताच वाईट ग्रह नाहीं ना व्हायचा ?

—वसंत, इतके दिवस इथं राहून माझ्या हृदयाची परीक्षा अजून तुला होऊं नये याला मी माझं दुर्भाग्य म्हणूं नये तर काय बरं म्हणावं ?

—मोहिनी ! क्षमा कर मला.—कांहींसा उत्तेजित होऊन वसंत पुढें म्हणाला,—तर मग खरोखर माझ्यासारखा भाग्यवान मीच. आतां कसलाहि आडपडदा न ठेवतां मी तुझ्याशीं बोलणार आहें !

इतकें बोलून वसंतानें मोहिनीला हलकेच जवळ ओढलें, तिचा उजवा हात आपल्या हातांत धरून तो त्यानें प्रेमभरानें दाबला व भावनावेगानें म्हटलें,

—मोहिनी ! तो दिवस मी कधींच विसरणें शक्य नाहीं. गौरूच्या लग्नदिवशीं झालेलं तुझं पहिलं दर्शन, माझ्या सुखद आठवणींत चिरंतन होऊन राहील. खऱ्या प्रेमाची कल्पना मला त्या दिवशींच आली. त्या मंगल दिवसापासून माझ्या अंतःकरणांत मी तुला कायमच स्थान दिलं आहे; आणि तें अढळच राहील. कोणत्याहि स्त्रीला तें स्थान मिळणं आतां कदापि शक्य नाहीं मोहिनी !

बोलतां बोलतां वसंत सद्गदित झाला. त्याच्यानें पुढें बोलवेना.

मोहिनीच्या डोळ्यांतून तर अश्रू ओघळूं लागले. ती ओक्साबोक्शीं रडूं लागली.

सूर्यबिंब इतक्यांत पार दृष्टीआड झालें होतें. थोड्या वेळापूर्वी चकाकणारे ते पांढरे शुभ्र ढग आतां काळे ठिक्कर होऊन इतस्ततः धांवत होते.

मोहिनीनें महत्प्रयासानें आपलें रडें आवरलें व रुद्ध स्वरांत म्हटलें,

—वसंत ! मी अभागिनी आहें. मला क्षमा कर. तुझ्या सहवासांत जन्म घालविण्याचें महत्भाग्य माझ्या नशिबांत नाहीं. मी परस्त्री आहें.

परपुरुषावरचें प्रेम, मग तें कितीहि उत्कट, दिव्य कां असेना तें, समाजाला खपत नसतं; त्याच्या दृष्टीनं तें पातक ठरतं. भटांच्या बडबडींत झालेल्या निष्प्रेम लग्नाला समाज मस्तकावर धारण करतो.

तिच्या डोळयांत वधस्तंभाकडे चालविलेल्या गाईची आर्द्रता, कारुण्य, असहाय्यता ओतप्रोत भरलेली होती.

—मोहिनी ! अशी काकुळतीनं माझ्याकडे नको ग पाहूंस ! त्यामुळं माझ्या जिवाचं पाणी पाणी होतं आहे.

—वसंत ! जिथं प्रेमाचं वास्तव्य झालं, तिथं सान्निध्यसुखाची आशा कुणाला असणार नाहीं ? तुझ्या सहवासाची तळमळ मला कितीहि तीव्रतेनं भासत असली, तरी तुझ्या सान्निध्यांत माझं सारं आयुष्य घालविणं कधीं तरी शक्य आहे का ?

—मोहिनी ! माझ्या लाडक्या मोहिनी ! तसं होणं शक्य कां असूं नये ?

इतकें बोलून वसंतानें भावनेच्या प्रबळ आवेगांत मोहिनीला एकदम ओढून तिला आपल्या हृदयाशीं कवटाळून धरलें.

यावेळीं वसंताच्या चेहेऱ्यावर एक प्रकारचा उच्च, सात्विक नी अनिर्वचनीय अशा स्वरूपाचा भाव उमटलेला होता; डोळयांतून नितांतमधुर, उत्कट प्रेमाचें दिव्य तेज ओसंडून पहात होतें...आणि मोहिनी असहाय्य अगतिकपणें त्याच्या खांद्यावर मान टाकून निस्तेज आवाजांत म्हणत होती,

—तें मी काय सांगूं ? तें मी काय सांगूं ?

---

कुचंबणा—सत्यकथा.
व्यं. अ. पै रायकर.

# व्यामोह

दुपारची वेळ होती. उकाडा भयंकर होत होता. अशा वेळीं व्हेनिसहून सुटलेली आगगाडी मार्सेल्सला मोठ्या वेगानें जात होती.

त्या गाडीच्या एका डब्यांत, मजबूत बांध्याची, सुमारें तीस पस्तीस वर्षांची एक इटालियन तरुणी जवळजवळ सबंध बांक अडवून बसली होती. जवळच तिची कपड्यांची बॅग, खाण्या-पिण्याच्या जिन्नसांची एक वेताची टोपली व बेडिंग एवढें सामान दिसत होतें.

दुसऱ्या बाजूच्या बांकावर एका कोंपऱ्यांत पिळदार अंगाचा, वीस पंचवीस वर्षांचा एक तरुण बसला होता. जवळच त्याचें सामान, म्हणजे एक कुदळ, एक फावडें नी एक टोपली एवढेंच होतें. त्या तरुणाची मुद्रा मलूल, काळवंडल्यासारखी झाली असून त्याचे ओष्ठद्वय किंचित पांढरे नी फिकट दिसत होते.

गाडी मोठ्या वेगानें जात होती. डब्याच्या खिडकींतून येणाऱ्या बाहेरील उन्हाची झळ गाडींतील उतारूंना लागत होती.

—हुश्शः! आज उकाडा कसा अगदीं असह्य होत आहे— असें स्वतःशींच बोलून त्या इटालियन बाईनें आपल्या झग्याचे गळ्याजवळचे दोन बटन सोडले.

तिच्या उद्गाराबरोबर त्या गरीब इटालियन मजुराचें लक्ष तिच्याकडे एकदम वेधलें गेलें. त्यानें तिच्याकडे आपली नजर वळविली. बटण सोडल्यामुळें तिचा शुभ्र, तांबूस रंगाचा मांसल गळा व अर्धें अधिक वक्षस्थळ त्याला दिसलें.

त्याची नजर क्षणमात्र तिच्यावर खिळून राहिली. तिनेंहि त्याच्याकडे पाहिलें; पण त्याबद्दल तिला मुळींच संकोच वाटला नाहीं. उलट ह्या क्षुद्र मजुराची पर्वा ती काय करायची, किंवा ह्याच्याजवळ शिष्टाचार तो कसला बाळगायचा, असेंच तिची बेफिकीर मुद्रा सुचवीत होती.

कांहीं वेळानें तिनें आपली वेताची टोपली जवळ ओढली व तिच्यांतील एक दोन संत्रीं, कांहीं बिस्किटें अन् एक 'बीर' ची बाटली बाहेर काढली.

प्रथम तिनें तीं संत्रीं खाल्लीं, नंतर बिस्किटें खलास केलीं व शेवटीं ती 'बीर' ची सबंध बाटली तिनें रिकामी केली.

तो इटालियन मजूर, मधूनमधून हळूच मान वर करून किलकिल्या नजरेनें आशाळभूतपणें तिच्याकडे पहात होता. पण आपला खाना आटोपेपर्यंत तिनें त्याच्याकडे एकदांहि ढुंकून पाहिलें नाहीं.

आपलें खाणें झाल्यावर तिनें ती टोपली हळूंच बाजूला ढकलली. हातरुमालानें कपाळावरील घाम टिपला आणि समोरच्या त्या मजुराकडे पाहून म्हटलें,

— आज उकाडा अगदीं फार होत आहे, नाहीं ?

तिच्या ह्या प्रश्नानें तो मजूर क्षणमात्र गोंधळला; तथापि स्वतःला लगेच सांवरून घेत त्यानें उत्तर दिलें,

—हो, आज जरा नेहमींपेक्षां जास्त उकडतं खरं !

यावर ती इटालियन तरुणी म्हणाली,

— बरं, हें सांग, तूं कोण नी कुठं जात आहेस आतां ?

—नेपल्स्‌चा मी एक गरीब मजूर असून मोलमजुरी करून पोट भरावं या हेतूनं मार्सेल्सला जात आहे. माझं नांव व्हीव्हीयानी.

—असं का?–ती तरुणी उद्गारली.––मीही पण मार्सेल्सलाच जात आहे. तेथील एका प्रख्यात लॉर्डच्या घरीं त्याच्या तान्ह्या मुलास दूध देण्यास मी दाई म्हणून असतें. काल माझ्या म्हाताऱ्या आईचा वाढदिवस होता म्हणून दोन दिवसांची रजा काढून मी घरीं गेलें होतें. मला 'जेनी' असं म्हणतात.

जरा थांबून ती म्हणाली,––आधींच हा उकाडा असह्य, आणि त्यांतून कालपासून मी पाजलेलं नसल्यामुळं मला आतां दूध कसं शिर-शिरून आलं आहे.—असें म्हणून निःसंकोचपणें आपल्या झग्याचे आणखी दोन बटण तिनें सोडले. त्याबरोबर तिचे पुष्ट, भरदार व पांढरे शुभ्र असे रसरशीत वक्षोज एकदम मोकळे होऊन मंदपणें झुलूं लागले.

व्हीव्हीयानीनें हळूच तिच्याकडे पाहिले. तो एकदम थिजूनच गेला. अशा स्थितींत ती असतांना तिच्याशीं कसें बोलावें हें त्याला समजेना.

—जर या वेळेस एकादं मूल, मला पाजायला मिळालं असतं तर किती बरं झालं असतं! पण तसं कुठल व्हायला? आज रात्रीं दहा वाजल्यानंतर मी मार्सेल्सला पोंचणार अन् त्यानंतर माझं हें ओझं दूर होईल;! त्यापूर्वीं हें असंच तळमळत रहायचं!

असें म्हणून जेनीनें हताशपणें सुस्कारा सोडला व आपले डोळे मिटून घेतले.

व्हीव्हीयानीला तिची दया आली. त्यानें तिच्याकडे सहानुभूतीनें पाहिलें. तिची खिन्न मुद्रा त्याला पहावेना. तिचे मोठे मोठे, गोरे गोरे, सुंदर स्तन अगतिकपणें, तिच्या हालचालींबरोबर हालतांना केविलवाणे दिसत होते अन् दुधाच्या स्रावामुळें ते भिजून गेले होते. जणूं दुःखातिशयानें ते रडतच होते.

थोड्याच वेळानें कोणतेंसें एक स्टेशन आलें. त्याबरोबर जवळचें एक पातळसें वस्त्र तिनें कसें तरी आपल्या छातीवर टाकलें अन् ती बाहेर पाहूं लागली.

स्टेशनच्या आवारांत विशेष गर्दी दिसत नव्हती. एक श्रीमंत दिसणारी हडकुळी बाई एका बांकावर बसून आपल्या लहान मुलाला पाजीत होती व पुरेसें दूध मिळत नसल्यामुळें तें मूल मधून मधून जोरानें रडत होतें नी किंचाळत होतें, व आतां कसें करणार अशा आविर्भावानें केंविलवाणी मुद्रा करून ती बाई इकडे तिकडे पहात होती.

तें पाहून व्हीव्हीयानी चट्कन् जेनीला म्हणाला,

—हें पहा मादाम ! तें मूल जर तुम्हाला पाजायला मिळालें तर चालेल कां ?

जेनीनें आपली दृष्टी त्या मुलाकडे वळविली आणि आनंदून म्हटलें,

—वाः ! तर मग देवच पावला म्हणायचा ! मला जर कुणी तें मूल पाजायाला आणून दिलं, तर मी त्याला दहा फ्रँकसुद्धां देईन.

तिची ती उत्कंठा पाहून मुलाला आणण्याच्या हेतूनें व्हीव्हीयानी गाडींतून उतरणार इतक्यांत शिटी होऊन गाडी चालू झाली. त्यामुळें अर्थातच त्याचा नाईलाज झाला. तो खिन्न मुद्रेनें परत आपल्या जागेवर येऊन बसत म्हणाला,

—मादाम, दिलगीर आहें मी !

गाडी सुटलेली पहातांच जेनी हताश स्वरानें म्हणाली,

—देवा ! आतां कसं होईल माझं ? सबंध दिवसभर मी आतां कशी राहूं ?— असें म्हणून तिनें आपल्या अंगावर घेतलेलें तें वस्त्र जोरानें बाजूला फेंकलें नी आपले दोन्ही हात छातीशीं आंवळून धरले.

तिची ती अनुकंपनीय अवस्था पाहून व्हीव्हीयानीचें हृदय कळवळलें. तो भीत भीत, हलक्या आवाजांत तिला म्हणाला,

—मादाम, मी एक विचारूं का तुम्हाला ? जर तें दूध इतकं त्रासदायक होत असेल तर तें मी चाखून काढूं का ?

त्याबरोबर जेनी आत्यंतिक आनंदानें नि विस्मयानें एकदम बाकावरून उठली व व्हीव्हीयानीचे दोन्ही हात पकडून म्हणाली,

—सिनोर व्हीव्हीयानी ! खरंच तूं हें काम करशील? मला हें समाधान देशील का तूं?

—तुमची मान्यता असेल तर माझी तयारी आहे.

—Tre's oblige—ती कृतज्ञतेनें म्हणाली.—मग ये तर असा इथं.—इतकें बोलून जेनी त्याला आपल्या शेजारीं बसण्यास जागा करून देऊं लागली.

—तिथं नको मादाम ! मी हा असा खालींच बसतों म्हणजे पिण्यास मला चांगलं मिळेल.

असें म्हणून व्हीव्हीयानी खालीं गुडघे टेकून जेनीच्यासमोर बसला व आपलें तोंड त्यानें पुढें केलें.

जेनीच्या आनंदास पारावार राहिला नाहीं. तिनें झट्कन् आपला एक स्तन एखाद्या अर्भकाच्या तोंडांत द्यावा अशा आविर्भावानें त्याच्या मुखांत घातला.

आणि व्हीव्हीयानीनें तिचा स्तन एखाद्या अधाशाप्रमाणें आपल्या तोंडांत धरून तिच्या कंबरेला मिठी मारली व तो चोखण्यास जोरजोरानें सुरवात केली.

पांच दहा मिनिटांच्या आंतच व्हीव्हीयानीनें जेनीच्या दोन्ही स्तनांचा भार हलका करून तृप्त अंतःकरणानें ढेकर दिला.

जेनीची तगमग शांत झाली. व्हीव्हीयानीचे आभार कसे मानावेत तें तिला समजेना. कृतज्ञतेच्या स्वरांत ती म्हणाली,

—सिनोर व्हीव्हीयानी, तुझे आभार मी कसे मानूं ? हे घे तुला वीस फ्रँक; मला तूं आज कल्पनातीत समाधान प्राप्त करून दिलं आहेस.

—हें काय मादाम ? ठेवून घ्या तुमचे हे फ्रँक्स ! तुम्ही माझे उपकार मानण्याऐवजीं उलट मीच तुमचे आभार मानायला हवेत; कारण तुम्हांला कल्पनाही नसेल, पण दोन दिवसपर्यंत मी कांहीं खाल्लेलं नाहीं किंवा प्यालेलों नाहीं. मी अगदीं उपाशीं होतों. पण तुमच्या दुग्धामृतानं मी अगदीं तृप्त होऊन गेलों आहे आतां !

---

Gui de Maupassant यांच्या एका गोष्टीवरून.

———

व्यामोह–सत्यकथा
व्यं. अ. पै रायकर

# देवीचा कौल

त्या गांवांत सांत पै सारखा शांत स्वभावाचा, प्रेमळ, निर्व्यसनी अन् परोपकारबुद्धीचा इसम दुसरा नव्हता.

त्याचें वय पन्नाशीच्या जवळपास होतें, पण दारिद्र्याच्या चटक्यांनीं त्याचें अंतःकरण नेहमीं पोळत असल्यानें, त्याची साठी उलटून केव्हांच गेली असावी असें त्याला पाहून वाटे.

डोक्यावर एकही काळा केस शिल्लक राहिला नव्हता त्याच्या! डोळे किती तरी खोल गेले होते, गालफडें बसलीं होतीं, कशा तरी वाढलेल्या मिशा पांढऱ्या झाल्या होत्या, अंगाला सुरकुत्या पडल्या होत्या अन् देहाचा अस्थिपंजर झाला होता. अशा स्थितींत डोक्याला तो जीर्ण रुमाल गुंडाळून, अंगांत ठिकठिकाणीं फाटलेला, मूळच्या रंगाचा मागमूसहि न राहिलेला तो 'कुतांव'+ घालून आणि तें मळकट धोतर नेसून सांत पै रस्त्यावरून अनवाणी चालूं लागला म्हणजे पहाणाऱ्याच्या मनांत त्याच्याविषयीं चट्कन् सहानुभूति निर्माण होई.

---

+ बंडी.

आणि त्याच्या आयुष्याची, वागणुकीची माहिती असणाराला तर त्याची विशेष कींव येई अन् त्याचें मन आश्चर्य व खेद यांनीं भरून जाई.

सांत पै कमालीचा ईश्वरभक्त होता. आपल्या कुलदेवीची—कामाक्षीची—पूजा केल्याशिवाय तो दुपारचें कधींही अन्नग्रहण करीत नसे. दर अमावास्येस होणाऱ्या देवीच्या मासिक पालखीस पांच कोसांचें अंतर पायांनीं तोडून शिरोड्यास जाण्याचा त्याचा क्रम आज किती तरी वर्षें अव्याहत चालू होता. तो सर्वांशींच प्रेमानें वागे; चुकूनसुद्धां त्यानें कधीं कुणाला वाईट शब्द दिला नाहीं किंवा कोणाचें वाईट व्हावें असें इच्छिलें नाहीं. एवंच तो पराकाष्टेचा सज्जन होता.

आणि असें असूनही त्याचें दारिद्र्य त्याला अधिकाधिक चिकटूं लागलें होतें.

तंबाकूच्या विड्या तयार करून व विकून तो आपल्या कुटुंबाचा उदरनिर्वाह मोठ्या कष्टानें अन् मिनतवारीनें चालवी.

कधीं नुसत्या पेजेवर, कधीं अर्धपोटीं तर कधीं उपाशीं राहूनहि, त्याच्याच पावलांवर पाऊल ठेवून त्याची पत्नी व एकुलती एक उपवर मुलगी आनंदानें दिवस कंठीत होती.

卐

—अग ! आज घरांत आजच्यापुरते तरी तांदूळ शिल्लक आहेत ना ?—सांत पैनें तंबाकूचा ‘ काडा ’ चघळीत पार्वतीला विचारलें.

पार्वती आपल्या मुलीचे—कावेरीचे—केस विंचरीत ओटीवर बसली होती. पतीच्या प्रश्नानें तिच्या अंतःकरणांत कालवाकालव झाली, डोळयांत अश्रू थरारले; तथापि दुसऱ्याच क्षणीं आपल्या चेहऱ्यावर कसलीच चलबिचल न दाखवितां ती म्हणाली,

— आहेत आजच्यापुरते. आतां दुपारच्या जेवणास व रात्रींच्या पेजेस ते कांहीं कमी पडणार नाहींत.

अशा परिस्थितींतहि आपल्या पत्नीची समाधानी वृत्ति पाहून सांत पैचें मन अभिमानानें नी आनंदानें भरून गेलें. वर्षकांठीं हजार बाराशें रुपये उत्पन्न असलेल्या शेजारच्या घरांत पदोपदीं दिसून येणारी अशांतता, बायकांची धुसपूस, प्रत्यहीं चालत असलेला पतिपत्नींचा झगडा, हें आठवून त्याला आपली स्थिति कितीतरी सह्य वाटली. आपल्या घरांत नांदणारें समाधान त्याला कितीतरी मोलाचें वाटलें.

थोड्या वेळानें कावेरी आपलें अंगधुणें करण्यास गेलेली पाहून, सांत पै आपल्या पत्नीच्या शेजारीं जाऊन बसला व हलक्या आवाजांत म्हणाला,

— हें पहा! तें विसु शणैच्या मुलाचं स्थळ तुला पसंत आहे का?

— असं काय तें विचारणं? आंधळा का कुठें दोने डोळे मागत असतो? पण तें स्थळ आमच्या आटोक्यांतलं का आहे? विसु शणै पांचशेंवरून शंभरावर जरी आतां आलेला असला, तरी तितक्या रकमेचीसुद्धां तरतूद करणं आम्हांला अशक्यच; नाहीं का?

— अग! तें तुझं सगळं खरं, पण मुलीला आतां आणखी किती दिवस अशीच ठेवणार? आज जें आम्हांला शक्य नाहीं, तें आणखी चार किंवा पांच वर्षांनीं शक्य होईल अशी आशा आहे का? कावेरीला हें सतरावं वर्ष चालू आहे ना?

—हो तर! येत्या मार्गसीरांत सतरावं संपून तिला अठरावं लागेल.—पार्वतीबाई आपल्याशींच हाताचीं बोटें मोडून हिशेब करीत म्हणाली.

—मला तर त्या पोरीला पाहिल्याबरोबर कसं अगदीं भडभडून येतं. किती सालस अन् गुणांची माझी बाळ! पण आमच्यासारख्या भिकारड्यांच्या पोटीं जन्म घेतल्यामुळं तिच्या गुणांचं,

सौंदर्याचं मातेरं झालं. ती अन्नाला महाग झाली व कोण जाणे, भविष्यकाळाच्या उदरांत आणखी काय आहे तें? ह्या कपाळकरंट्या बापाला शंभर रुपयांची शक्यता नसल्यामुळं तिला, एकुलत्या एका पोटच्या गोळ्याला, एखाद्या सैंपाक्याच्या गळयांत बांधून देण्याचं तर आमच्या नशिबांत नसेल ना?

इतकें बोलून सांत पै आपल्या फाटक्या उपरण्यानें आपले डोळे हळूंच पुसूं लागला.

पार्वतीबाईचाही गळा भरून आला. ती गद्गद स्वरांत म्हणाली,

—अं हं, कां बरं तुम्ही उगीच जीवास लावून घेतां? नशिबांत असलेलं टाळणं कुणाच्या बरं हातीं आहे? देवीची इच्छा! तिला जसं पाहिजे तसं ती करील!

—खरंच! माझा तर तिच्यावर अढळ विश्वास आहे. कावेरीच्या लग्नाची काळजी त्या सर्वशक्तिमान् आदिमायेलाच; तिच्यावांचून आम्हांला कोण बरं पाठिराखा आहे?—इतक्यांत च‍ट्कन् आठवल्यासारखें करून सांत पै पुढें म्हणाला,

—हो! बरी आठवण झाली. परवां दशमी ना? तर मग देवीचा कौल घेण्यास उद्यां मला दसऱ्यास शिरोड्याला गेलं पाहिजे.

देवीचे सारे महाजन उद्यां मोटारीनें मजेंत शिरोड्याला जाणार आणि आपल्या पतीला मात्र अशा वृद्धापकाळांत, अवघ्या आठ आण्यांच्या गोष्टीसाठीं पायींच रखडत जावं लागणार हें मनांत येतांच पार्वतीबाईच्या अंतःकरणाची विलक्षण कालवाकालव झाली. तिनें हळूच एक दुःखपर्ण निश्वास सोडला.



कोंबड्याचा साद कानावर पडतांच सांत पै धडपडून उठला; आगपेटी काढून उशाजवळचा रॉकेलचा दिवा त्यानें पेटविला व

अधीर अंतःकरणानें आपल्या निद्रिस्त पत्नीस हांक मारली,—अग, अग ए! हें पहा ऊठ! मला देवीचा दृष्टांत झाला आतां.

सांत पैच्या बोलण्यानें जवळच झोंपलेली पार्वतीबाई व कावेरी धडपडून उठलीं. झोपेंतून अकस्मात् उठल्यामुळें त्यांना प्रथम आपणांस कां जागें केलें तें समजेना.

—काय बाप्पा? काय झालं?—कावेरी आपल्या बापाजवळ येऊन बसत म्हणाली.

—अग? मला आतांच एक स्वप्न पडलं. दुपारची वेळ होती. मी नित्यनेमाप्रमाणं कामाक्षीची पूजा करीत होतों. इतक्यांत देव्हाऱ्यांतून एक तेजःपुंज स्त्री खालीं उतरली. तिनं मानेवर आपले केस स्वैरपणें सोडलेले होते; कपाळावर आडवं कुंकू रेखून लावलं होतं; मुद्रा हंसतमुख, सतेज अन् सुंदर दिसत होती.

—ती आली आणि माझ्या मस्तकावर हात ठेवून म्हणाली, 'सांत पै, भिऊं नकोस! उद्यां शिरोड्याला जा. तिथं, तुझ्या अडचणींतून तूं मुक्त होशील असा कौल मी तुला देईन. त्याचा तूं स्वीकार कर व तुझ्या कावेरीचं लग्न त्या विसु शणैच्या मुलाशीं उरकून घे.'

—इतकं बोलून ती पुन्हां देव्हाऱ्यांत गेली अन् दिसेनाशी झाली. आणि इतक्यांत कोंबड्याच्या सादानें मी जागा झालों....

उन्हाच्या प्रखर तापानें कोमेजलेल्या झाडांच्या पानांवर अकस्मात् पावसाची वृष्टि व्हावी म्हणजे त्या पानांना जशी टवटवी येते तशीच टवटवी पार्वतीबाईच्या मुखावर आली अन् भावी सौख्याच्या कल्पनेनें कावेरीच्या हृदयांत अननुभूत आनंदाच्या लहरी नाचूं लागल्या.



भर दुपारीं सांत पै शिरोड्यास पोंचला. घामानें त्याचा 'कुतांव' भिजून चिंब झाला होता, चालण्याच्या श्रमानें मस्तकांतून घामाच्या

धारा निथळत होत्या, घसा कोरडा पडला होता, अनवाणी चालून आल्यामुळें पायांच्या तळव्यांची आग होत होती, अन् घामानें भिजलेल्या त्याच्या पावलांवर धुळीचे जाड थर सांचले होते.

तो प्रवेशद्वारावरील 'शेज्या'खालीं पोंहोंचला. तेथून दृष्टोत्पत्तीस येणारा तो समोरचा रमणीय देखावा पाहून त्याला कितीतरी बरें वाटलें. देवळाच्या शिखरावर असलेला तो नमुनेदार दुमजली अष्टकोनी 'घुड', त्याच्या सभोंवार लावलेले ते चित्रविचित्र रंगाचे कांचेचे दिवे आणि ते लोलक, सूर्याच्या प्रखर किरणांनीं चमकणारा तो घुडावरील सोन्याचा कळस, देवळाच्या पुढच्या बाजूस दिसणारा तो लांबच लांब सुंदर मंडप आणि त्याच्यापुढें असलेला तो भव्य व उंचच उंच वाटोळा दीपस्तंभ! जणुं काय त्या देवळावरील पहारेकरीच! हें सगळें पाहून सांत पैच्या चित्तवृत्ती उल्हसित झाल्या अन् चालून आल्यामुळें झालेल्या श्रमाचें त्याला आतां कांहींच वाटेनासें झालें.

तो आनंदित मुद्रेनें प्राकारांत शिरला. सगळीकडे उल्हास भरून राहिला होता. उत्सवासाठीं जमलेल्या लोकांची दाट रहदारी व गडबड जिकडे तिकडे दिसून येत होती.

तो सरळ प्राकारापुढें खालच्या बाजूनें, तलावाच्या दिशेनें चालूं लागला.

सुंदर बांधकाम केलेल्या त्या तलावावर त्यानें आपले हात पाय, तोंड धुवून घेतलें, डोळ्यांवर पाण्याचे भपकारे मारले, आणि रुमाल काढून आपल्या तुळतुळीत डोक्यावर थंड पाण्याचा त्यानें शिडकाव केला.

त्याला आराम वाटला. प्रसन्न मुद्रेनें देवीची भेट घेण्यास तो देवळांत गेला.

समोर दिसणाऱ्या भव्य, रुपेरी आसनावरील देवीच्या तेजःपुंज, सुंदर मूर्तीस पहातांच, सद्गदित अंतःकरणानें त्यानें चौकावर साष्टांग नमस्कार घातला.

सांत पैनें आपली एकाग्र नजर देवीकडे लावली. त्याच्या डोळ्यांतून अश्रू गळूं लागले. आपल्या संसाराचें कारुण्यपूर्ण हृदयभेदक दृश्य त्याला दिसूं लागलें.

किती तरी वेळ मनांतल्या मनांत सांत पैनें देवीची अनन्य भावानें करुणा भाकली, अन् प्रसादतीर्थ घेण्यासाठीं तो पुढें सरकला.

देवळांत एकच गर्दी दिसत होती. आपापल्या शक्तीप्रमाणें अन् पद्धतीनुसार पैसे, नारळ, इत्यादि जिन्नस देवीच्या पुढें ठेवून भाविक लोक नमस्कार करीत होते. आणि त्या सर्वांस देवळांतील पुजारी तीर्थप्रसाद वांटीत होता.

गणेशभटाची एकच धांदल उडाली होती. देवीच्या भेटीस आलेल्या इतर जिन्नसांप्रमाणें त्याच्यासमोर तांब्यांच्या पैशांची रास पडली होती. आणि त्या राशींत तुरळक दिसणारीं पांढऱ्या धातूचीं निरनिराळ्या आकाराचीं नाणीं डोकावून पहात होतीं.

सांत पै, गर्दींत हळूच पुढें झाला व देवीसाठीं घराकडून आणलेला तांब्याचा एक ढबू पैसा त्यानें त्या राशींत टाकला. चालून येतांना वाटेंत तहानेनें त्याचा जीव अगदीं हैराण झाला होता. त्यावेळीं रस्त्यावरील एखाद्या दुकानांतील सोडावॉटर पिऊन तहान शमवावी, असें त्याला प्रथम वाटलें. पण दोन पैशांपेक्षां आपल्याजवळ आणखी एक फुटकी कवडी नाहीं आणि ते पैसे देवीच्या भेटीला घातले पाहिजेत याची जाणीव होऊन त्यानें तो मोह टाळला होता.

श्रीमंत, भाविक गिऱ्हाइकांवर गणेश भटाची लोभी नी हावरी नजर भिरभिर नाचत होती. त्यांच्यापुढें त्याला सांत पैची ती दरिद्री मूर्ती दिसावी कशी! आणि नाण्याच्या निनादानें भारावून गेलेल्या त्याच्या कानांना, प्रसादतीर्थ देण्याबद्दल सांत पैनें पुन्हां पुन्हां आर्जवून केलेली विनंति ऐकूं कशी यावी!

शेवटीं बराच वेळ ताटकळत राहून, लोकांची गर्दी कमी झाल्यानंतर सांत पैनें तीर्थप्रसाद घेतला अन् बिऱ्हाड घेऊन आलेल्या एका धनिक महाजनाच्या घरीं तो वस्तीस गेला.



आज दसऱ्याचा उत्सव. सायंकाळीं चार वाजण्याच्या सुमारास देवीची रुपेरी पालखी, बरोबर दोन तरंगें यांची दिंडी–भजनाच्या व पंचवाद्यांच्या साथींत मोठ्या थाटानें मिरवणूक निघाली.

सायंकालीन सूर्याच्या किरणांनीं रुप्याची नक्षीदार पालखी चकाकत होती. आंत बसविलेल्या देवीचें सोन्याचें मुखमंडल, तेजानें तळपत होतें. तिच्या अंगावर विविध प्रकारचे मूल्यवान अनेक दागिने झळकत होते. डाव्या हातांत ढाल नी उजव्या हातांत लहानशीच सोन्याची तरवार देऊन, रुप्याच्या सिंहावर बसवून बांधलेली देवीची पूजा भाविक नेत्रांचें पारणें फेडीत होती.

पाठीवरील रेशमी भरजरी शालूच्या पदरावर सोडलेली देवीची ती केंसांची वेणी, तिच्यावर लोंबकळणारा सुवर्णाच्या पदकांचा तो हार आणि डोक्यावरील ते दागिने हें सगळें पाहून एखाद्या राजशाली श्रीमंत घराण्यांतील स्त्रीच पालखींत बसून आपल्या लवाजम्यानिशीं जात आहे कीं काय, असें रसिक प्रेक्षकाला वाटल्यावांचून रहात नसे.

उत्सवास गर्दी बेसुमार होती. देवळाच्या आसपासची जागा स्त्रीपुरुषांनीं नुसती फुलून गेली होती.

दिंडी–भजनाच्या सुरम्य साथींत मिरवणूक चालली होती. भजनाला विलक्षण रंग भरला होता. विशिष्ट ठिकाणीं पालखी थांबतांच

ऑर्गनच्या साथींत, रागदारीवर सुरेल आवाजांत चाललेलें भजन भर उन्हांत राहूनहि लोकसमुदाय तन्मयतेनें ऐकत होता.

'हर हर महादेव' म्हणून पालखी पुढें सरतांच, उच्च, विरल वातावरणांत विहार करणारीं आपलीं हृदयें, जणूं काय एकदम खालीं येत आहेत असें श्रोत्यांना वाटल्यावांचून रहात नसे.

सर्व प्राकारभर फिरून सुमारें सात वाजतां, अफाट गर्दीच्या जनसमुदायासमवेत पालखी देवळांत शिरली.

पंचवाद्यांच्या कडकडाटांत अन् कोलाहलांत प्रत्येक महाजन, तरंगें घेऊन रहाणाऱ्या व्यक्तीच्या हातांतून देवीचा कौल घेण्यास, हातांत नारळ घेऊन पुढें होऊं लागला.

सर्वांनीं कौल घेतले. सांत पैनेंही आपला नारळ पुढें करून भक्तिभावानें कौल घेतला. त्यावेळीं स्वप्नांत दृष्टांत देऊन देवीनें सांगितलेल्या कौलाची आठवण झाल्याशिवाय त्याला राहिली नाहीं.



दुसऱ्या दिवशीं सकाळीं प्राकारांत ज्याच्या त्याच्या तोंडीं एकच बातमी घोळत होती. ती ही, कीं वसंतबाब कामत यांच्या बोटांतील एक मौल्यवान् सात हिऱ्यांची आंगठी कालच्या उत्सवांत पखवाज वाजवितांना कुठें तरी गहाळ झाली.

वसंतबाब कामत हे मडगांवचे धनिक, तरुण गृहस्थ असून ते कामाक्षी देवीचे महाजन होते. ते पखवाज फार छान वाजवीत, पखवाज वाजविण्यांत त्यांचा हात धरणारा इसम उभ्या गोमंतकांत कुणीही नव्हता.

उत्सवास आलेल्या लोकांना ही बातमी ऐकून वाईट वाटलें. त्यांचीं मनें विषण्ण झालीं. कालच्या उत्सवांत पखवाज वाजवितांना भिरभिर फिरणारीं वसंतबाबांचीं तीं लांबट बोटें व त्यांपैकीं एका बोटांत चमचम करणारी ती तेजस्वी आंगठी आतां अंतःचक्षूंपुढें लोकांना स्पष्टपणें दिसूं लागली.

काल रात्रींच जेवण्याच्या वेळीं वसंतबाबाच्या लक्षांत ती गोष्ट आली होती. पण तो स्वभावानें फारच प्रेमळ, सुसंस्कृत नि विचारी तरुण असल्यानें, आपल्या निकटच्या एक दोन मित्रांशिवाय त्यानें ही गोष्ट प्रथम कुणालाच सांगितली नव्हती. त्यानें गुप्त-पणें टॉर्चच्या प्रकाशांत सर्व प्राकारभर आंगठीचा शोध केला होता. पण कांहींच निष्पन्न झालें नव्हतें.

आणि आज दुसऱ्या दिवशीं ही गोष्ट सगळीकडे पसरून राहिली.

उत्सव संपल्यामुळें बरेचसे लोक सकाळीं उठून आपापल्या घरीं जाण्यास निघाले. सांत पैनेंही घरीं जाण्याच्या तयारीनें आपलें बोचकें बांधलें अन् निघण्यापूर्वीं देवीस नमस्कार करण्यास तो देवळांत गेला.

अनिमिष नेत्रांनीं त्यानें कामाक्षीच्या मूर्तीकडे पाहिलें. आणखी बरेच दिवसपर्यंत आपणास ही मूर्ती दिसणार नाहीं म्हणूनच कीं काय तो तिला आपल्या हृदयांत सांठवूं पहात होता.

वसंतबाबाची आंगठी हरवलेली ऐकून सांत पैलाहि फार वाईट वाटलें होतें. सकाळीं उठून नगरप्रदक्षिणा घालतांना प्राकाराच्या रस्त्यांत त्यानें बारीक नजरेनें आंगठीचा तपास केला होता. पण कुठेंच त्याला ती दिसली नाहीं.

कुठें तरी गहाळ झालेली ती आंगठी तिच्या मालकाला मिळावी, उत्सवासाठीं आलेल्या त्या प्रेमळ तरुणाचें मन खिन्न होऊन जाऊं नये, शिवाय अमुक जागीं, अमुक उत्सवाच्या वेळीं आंगठी गहाळ झाली असा टपका ह्या जागेवर न यावा, म्हणून सांत पैनें देवीची कळकळीनें प्रार्थना केली.

देवीचा अंगारा व प्रसाद, एका लहानशा कागदांत बांधून घेऊन तो मंडपांत आला. देवळाच्या बाहेर दोन्ही बाजूस असलेल्या कालभैरव व वेताळ या उभय देवांना त्यानें नमस्कार केले व सद्गदित अंतःकरणानें तो बाहेर आला.

नेहमींप्रमाणें मंद पावलांनीं खालीं मान घालून सांत पै चालूं लागला. मंडपाच्या बाहेरील मोठ्या दीपस्तंभाजवळ पोंचतांच त्याच्या खालीं एका कडेला पाचोळ्यांत त्याला चकचकीत असें कांहीं दिसलें. त्यानें कुतूहलानें पाचोळा बाजूला सारून पाहिलें, तों काय एक वज्रजडित आंगठी! वाटेच्या तबकडावर एकास एक लागून असलेले सात हिरे आपल्या धवल तेजानें चकाकत होते.

आंगठी पाहून सांत पैला हर्षवायुच झाला. वसंतरावाचें अंत:-करण आनंदित करण्याचें सामर्थ्य आतां आपल्याला आलें या परोपकारवृत्तीच्या विचारानें व आनंदानें तो बेहोष झाल्यास त्यांत नवल तें कसलें ?

आनंदित मुद्रेनें अन् द्रुत गतीनें तो वसंतबाबा असलेल्या जवळच्याच अग्रशाळेंत गेला.

त्या अग्रशाळेंत बडे बडे ' महाजन ' बसलेले होते. त्यांच्यांतहि आंगठीचीच चर्चा चालली होती. जवळच वसंतबाब एका लहान स्टुलावर बसून कसलेंसें पुस्तक चाळीत होता.

सांत पै संकोचित वृत्तीनें पुढें झाला. त्याला पाहिल्याबरोबर जवळच असलेल्या एका महाजनानें म्हटलें,

— काय, सांत पै ! आतां चाललांत तुम्ही ?

सांत पैनें कांहींच न बोलतां उत्तरादाखल स्मित हास्य करून होकारार्थी आपली मान हलवली.

तो हळूच वसंतबाब बसलेल्या जागीं गेला आणि पुटपुटला,

— वसंतबाब !

वसंतबाबानें चमकून वर पाहिलें. तों सांत पै !

वसंतबाब दयाळु मनोवृत्तीचा होता. त्यानें सांत पैला पाहिल्या-बरोबर म्हटलें,

—हं ! कोण ? सांत पै ? बसा कीं !—असें म्हणून वसंतबाबानें आपण उठून त्याला बसण्यास सांगितलें.

—छे! छे! तुम्ही बसा ना! हें पहा, आपली आंगठी मिळाली का?

प्रश्न करतांना सांत पैच्या चेहऱ्यावर मंद स्मित दिसत होतें.

—नाहीं बुवा! सगळीकडे तपास केला; पण कांहींच पत्ता लागत नाहीं. कुठं पडली कुणास ठाऊक!—वसंतबाब विमनस्कतेनें म्हणाला.

—कांहीं काळजी करूं नका तुम्ही वसंतबाब.—असें म्हणून कनवटीला खोवलेली ती आंगठी काढून त्याच्यापुढें करीत सांत पै म्हणाला,—ही पहा तुमची आंगठी! दीपस्तंभाच्या कडेला पाचोळयांत ती मला आतांच मिळाली.

आंगठी पहातांच सर्वांचें लक्ष तिथें एकदम वेधलें गेलें. सगळेजण सांत पैच्या भोंवतीं गोळा झाले. आणि त्यांनीं त्याच्या प्रामाणिकपणाची स्तुती मुक्त कंठानें करण्यास सुरवात केली.

आंगठी मिळाल्यापेक्षां सांत पैचा प्रामाणिकपणा पाहून वसंतबाबाला किती तरी अधिक आश्चर्य, आनंद झाला. तो गुणज्ञ होता. विश्वासास पात्र असणारीं माणसें जगांत आज विरळा होत चाललीं आहेत हें त्याला माहीत होतें.

शिवाय सांत पैची स्थिती त्याला अवगत नव्हती असें नाहीं. आरंभापासूनच वसंतबाबाला त्याच्याविषयीं सहानुभूति वाटत होती व आतां तर त्यावर कळसच झाला.

ती आंगठी बरीच मोलाची होती. हजार बाराशें रुपयांच्या दरम्यान आज बाजारांत तिची किंमत होती.

वसंतबाबानें सांत पैचे कितीतरी आभार मानले, त्याच्याशीं मनमुराद गप्पागोष्टी केल्या आणि त्याला प्रेमानें निरोप दिला.

आंगठी मिळाल्याची बातमी सगळीकडे पसरली. सर्वांना आनंद झाला. देवीनें आपल्या स्थळाचें नांव बद्दू करण्यास टीकाकारांना दिलें नाहीं असें कांहीं भाविक लोकांनीं उद्गार काढले.

आणि सांत पै दुपारचें जेवण घेऊन भर दोन वाजतां आपल्या घराकडे जाण्यास नेहेमींप्रमाणें पायींच रखडत निघाला.



दुसऱ्या दिवशीं सकाळीं जेव्हां, उभ्या जन्मांत कधींही पत्र घेऊन न आलेल्या पोस्टमननें दारांत राहून सांत पैच्या नांवाचा पुकारा केला तेव्हां त्याला आश्चर्य वाटलें आणि वसंतबाब कामत यांच्याकडून रजिस्टरनें आलेले तीनशें रुपये व सोबतचें पत्र ज्यावेळीं त्यानें पाहिलें, त्यावेळीं तर त्याच्या विस्मयास पारावर राहिला नाहीं. आत्यंतिक आनंदानें त्याचें मन भरून गेलें.

पत्रांत वसंतबाबानें दोनच ओळी मजकूर लिहिला होता.

परमपूज्य सांत पै यांच्या चरणसेवेशीं.

सोबत जात असलेले तीनशें रुपये, फूल नव्हे पण फुलाची पाकळी म्हणून आपण त्यांचा स्वीकार करून मला उपकृत करावें अशी नम्र विनंती आहे.

आपला उपकारबद्ध

**वसंत कामत**

सांत पैच्या हातांत असलेल्या त्या तीनशेंच्या तीन करकरीत नोटा, तें पत्र आणि सांत पैच्या डोळ्यांतून वहाणाऱ्या अश्रूंच्या धारा पाहून, जवळच उभ्या असलेल्या पार्वतीबाईला किंवा कावेरीला याचा कांहींच बोध होईना. कावेरीनें विस्मयचकित स्वरांत जरा दबकत विचारलें.

—बाप्पा ! तें काय ?

—हें होय ? —सांत पै कृतज्ञतेनें म्हणाला,—बाळ ! हा देवीचा कौल !

———

**देवीचा कौल–सत्यकथा**

**व्यं. अ. पै रायकर.**

# आचारीमाम !

खरोखर, त्या दिवशीं आमच्या आचारीमामचा जागता पहारा टॉयफाइडनें रुग्णशय्येवर आसन्नमरण पडलेल्या माझ्या देहाभोवतीं नसता, तर त्या भीषण अपरात्रीच्या काळ्याकुट्ट अंधारांत, सतत चोवीस वर्षें एका कुडींत वास केलेला माझा आत्मा, अनंतांत खात्रीनें तेव्हांच विलीन झाला असता! आणि माझी वृद्ध माता व अल्पवयी पत्नी यांची स्थिति...नको...ती कल्पनासुद्धां नाहीं करवत माझ्यानें...



त्याचें नांव जरी त्रिविक्रम आचार्य असलें, तरी आम्ही त्याला 'आचारीमाम' असें म्हणत असूं व ह्याच नांवानें त्याला सगळे जण ओळखत.

तसें पाहूं गेल्यास त्याचें वय कांहीं फार नव्हतें; असेल पस्तीस चाळीसच्या दरम्यान! पण त्याची ती बेडौल काया, गबाळ वेष, दाभणकांठी मिशा आणि या सर्वांवर कळस म्हणून, त्यानें डोक्यावर राखलेला एक तसूभर व्यासाचा तो घेरा नी

बिंदुस्थानीं असलेली निमुळती शेंडी यामुळें पाहाणाराला, आचारी मामाचें वय बरेंच जास्त असावें असें वाटे.

तो अंगांत सहसा कांहींच घालीत नसे. आठ हाती अरुंद, जाड, मळकट धोतर अस्ताव्यस्तपणें नेसून उघड्या अंगानें तो नेहमीं असायचा !

उजव्या हातांत चांदीचें एक भलें मोठें पाटलीवजा 'वेळ,' टाळू उघडी टाकून डोक्याला गुंडाळलेला तो मळकट पंचा नी कनवटीला लावलेली ती तपकिरीची लांबट रुपेरी डबी, अशा थाटांत आचारीमामची स्वारी लोकांना नेहमीं दिसायची !

त्याचा चेहरा नेहमीं हंसतमुख असे. हंसतांना तो आपला वरचा ओठ इतका वर नेई, कीं त्यामुळें त्याचें दांतांवरील सबंध मांस दृष्टीस पडे. वारंवार नाकांत कोंबण्याकरतां तपकिरीची चिमूट नेहमीं त्याच्या हातांत सज्ज असायची ! आणि ज्या ज्या वेळीं तो तपकीर ओढी, त्या त्या वेळीं, ओढलेली तपकीर जास्त वर जावी म्हणूनच कीं काय, तो उजव्या तळहातानें आपलें नाक, खालून पुन्हां पुन्हां वर सरकवी, त्यामुळें त्याचें नाक वारंवार दुमडलें जाऊन त्याला सुस्पष्ट अशी काळी खळगी पडली होती.

दुपारचें स्नान झालें, कीं गोपिचंदनाच्या दोन दोन बोटें रुंदीच्या मोठमोठ्या पट्टयांनीं आपलें पोट, छाती, हात सगळें तो रंगवून टाकी. कपाळाला लावीत असलेला त्याचा काळाकुट्ट अंगारा, व त्याच्या खालीं ढबूच्या आकाराएवढा तो गंधाचा लाल भडक टिळा, आचारीमामचें वैशिष्ट्य उठावदारपणें प्रगट करी.

आचारीमामाचा स्वभाव भारी प्रेमळ, निष्कपटी, परंतु अत्यंत भोळसर होता. तो सर्वांशींच प्रेमानें व लीनतेनें वागे. प्रसंगविशेषीं त्याला कुणी कितीही टाकून दुखवून बोललें तरी तें तो हंसण्यावारी नेत असे; उलट उत्तर देण्याचें त्याच्या अगदीं जीवावर येई.

या त्याच्या कमालीच्या साधेपणामुळें कांहीं लोक त्याची वेड्यांतच गणना करीत; पण वस्तुतः तो वेडा नव्हता.

वर्षाकांठीं दोन तीनशें रुपये उत्पन्न येईल एवढी माया त्याच्या वडिलांनीं केवळ भिक्षुकीच्या धंद्यावर जवळ केलेली होती; पण अवघ्या चार पांच वर्षांच्या कारकीर्दींत आपल्या व्यवहारज्ञानशून्यतेमुळें तो सर्व संपत्ति गमावून बसला. त्याच्या भोळया स्वभावाचा नी दिलदार अंतःकरणाचा भलताच फायदा घेऊन त्याच्या भाऊबंदांनीं नी भोवतीं गोळा झालेल्या मित्रांनीं त्याच्या टाळूवरून चांगलाच हात फिरविला व बिचाऱ्याला अगदीं कफल्लक करून सोडलें.

आचारीमामच्या स्वभावांत एक गोम होती; त्याला हरभऱ्याच्या झाडावर चढविण्यांत कोणालाही सहज व सुलभपणें यश येई; आणि अशा रीतीनें एकदां कां तो वर चढला, कीं ढुंगणास बांधलेलें सोडवून देण्यासही तो मागें पुढें पहात नसे. ही गोम ओळखूनच प्रत्येकानें त्याचा फाजील फायदा घेतला व बिचाऱ्याला अशा कंगाल स्थितींत आणून सोडलें.

जे लोक त्याच्या पैशांवर उड्या मारीत, तेच त्याच्या पाठीमागें त्याची टिंगल करीत; व ज्यावेळीं त्याच्याजवळची पुंजी अजिबात संपली, त्या वेळीं उघडपणें शब्दशरांनीं त्याला घायाळ करून सोडण्यास तेच निर्लज्जपणें प्रामुख्यानें भाग घेऊं लागले......

अशा ह्या लोकांनीं आचारीमामकडून किती तरी वेळां हातउसन्या रकमा प्रत्यहीं मागून नेल्या होत्या. व पुढें परत मागिलेल्या वेळीं त्या देण्याच्या ऐवजीं तेच लोक आचारीमामची टिंगल करूं लागले होते. शेवटी आचारीमामनें गांवच्या कांहीं प्रतिष्ठित इसमांविरुद्ध सरकारी फौजदाराकडे आपलें गाऱ्हाणें नेलें; पण त्या वेळीं चौकशीअंतीं त्याच्या देणेकरांनीं बेलाशक कानावर हात ठेवले व उलट त्यालाच वेडा ठरविलें. ज्या इसमांनीं त्याच्याकडून शेंकडोवारी

पैसे हातउसने नेले होते, ते फार धूर्त व कावेबाज असल्यानें त्यांनीं असा कांहीं खोटा पुरावा पुढें आणला, कीं त्याच्या पुढेंआचारी-मामचा निभाव लागेना. शिवाय ते गांवचे शिष्ट संभावित म्हणून मिरवत असत. अशा स्थितींत आचारीमामच्या फिर्यादीकडे अधिकारी लोक उलट साशंक नजरेनें पाहूं लागल्यास त्यांत नवल तें कसलें ? कारण, अशा शेंकडोवारी रकमा कुणी काय कांहींच कागदपत्र न करतां देत असतो ! व पुरावा नसतांना पैसे तरी वसूल करणें कसें शक्य आहे ?

अखेरीस, भल्या गृहस्थांची निष्कारण बदनामी केल्याबद्दल सरकारी अधिकाऱ्यानें उलट आचारीमामला चांगलें खडसावून वाटेला लावलें.

पण मनुष्याच्या सहनशीलतेलाही काहीं मर्यादा असते. त्रास असह्य झाले, अगदीं जीवावर बेतलें म्हणजे एखादें क्षुल्लक मांजर-सुद्धां मनुष्याच्या नरडीचा घोट घेण्यास मागें पुढें पहात नसतें.

अशीच गोष्ट एकदां आमच्या आचारीमामच्या बाबतींत झाली.

दिलेले पैसे परत मागतो म्हणून त्याच्या अशाच एका कृतघ्न देणे-कऱ्यानें त्याला अचकट विचकट शिव्या दिल्या. सर्व लोकां-समक्ष त्याची भलतीच चेष्टा कुचेष्टा करून त्याचीं वर्में न् कर्में बाहेर काढलीं. त्यावेळीं तो अपमान असह्य झाल्यामुळें आचारीमामनें त्या मस्तवाल देणेकऱ्याच्या अंगावर वेगानें धांवत जाऊन त्याच्या मानगुटीला धरलें व एकदम जोरानें त्याला खालीं आदळलें.

डोळ्याचें पातें लवतें न लवतें इतक्यांतच हा प्रकार घडला. सगळेजण जिथल्या तिथें स्तंभित होऊन टकमक पहातच राहिले. थोडक्यांत चुकलें, न पेक्षां त्या उर्मट देणेकऱ्याचें मस्तक जवळ-च्याच एका मोठ्या दगडावर आपटून तें एखाद्या टरबुजाप्रमाणें फुटून गेलें असतें.

झालें. तेव्हांपासून त्या गांवांत आचारीमामला वेड लागलें आहे असें सर्वत्र प्रसृत झालें, व हळुहळू सगळेजण त्याच्याकडे वेडा म्हणून पाहूं लागले.

शेवटीं तो बिचारा कंटाळला, वैतागला, त्रासला व एक दिवस अकस्मात् दुपारीं भर बारा वाजतां आमच्या गांवीं येऊन आमच्याकडे दाखल झाला.

आणि ज्यावेळीं आपल्या विसकटलेल्या, उध्वस्त झालेल्या संसाराची सारी हकीकत आम्हाला सांगून तो रडूं लागला, त्यावेळीं त्याची आम्हाला दया आली. आम्ही त्याला धीर देऊन कांहीं दिवस आमच्या घरीं रहाण्याबद्दल आग्रह केला. व त्याच्या बाबतींत झालेल्या अन्यायाकडे आम्ही शक्य तों लक्ष पुरवूं असेंहि त्यास आश्वासन दिलें.



हां हां म्हणतां एक वर्ष केव्हांच निघून गेलें. आपला प्रेमळ स्वभाव व गरीब नी परोपकारी वृत्ती यामुळें आमच्या घरांत आचारीमाम सर्वांना हवा हवासा वाटूं लागला. माझा तर तो अगदीं उजवा हातच होता. आचारीमामशिवाय मला मुळीं करमेनासें झालें. मी जाईन त्या ठिकाणीं तो माझ्याबरोबर असायचा ! माझ्या आरोग्याची, हिताची खुद्द माझ्यापेक्षांही जास्त काळजी तो घेई. आणि याचें प्रत्यंतर प्रत्येक बारीक सारीक बाबतींतही दिसन येई.



एक दिवस कसल्याशा कामाकरितां मी पणजीला निघून गेलों होतों, व जातांना संध्याकाळीं परत येईन, असें मी आचारीमामला सांगितलें होतें.

भर आषाढ महिन्यांतले दिवस ! आणि त्या दिवशीं तर पावसानें नुसती झोड उडवून दिली होती. सकाळीं आठ वाजतां मोटार सर्व्हीसची लॉरी आमच्या गांवाहून सुटायची व संध्याकाळीं चार

वाजतां पणजीहून परतून ती इथें सहा वाजण्याच्या सुमारास पोंचायची !

पण त्या दिवशीं येतांना मुक्कामाला पोंचायाला अगदीं थोडाच अवधी राहिलेला असतां वाटेंत लॉरी पंक्चर झाली. आणि ती दुरुस्त होईपर्यंत तिथेंच सात वाजले.

शेवटीं एकदांची मोटार दुरुस्त होऊन चालूं लागणार इतक्यांत, भर वादळी पावसांत वावटळीनें भिजून चिंब झालेल्या आचारी-मामची मूर्ति दुरून येतांना मी ओळखली. डाव्या हातांत धोतर व उजव्या हातांत छत्री कशीबशी संभाळीत, दोन मैल लांबीचें अंतर पायांनीं तुडवून आचारीमाम माझ्या शोधार्थ येत होता.

...आणि ज्यावेळीं मोटारींत रेनकोटमध्यें सुटांतबुटांत व्यवस्थित-पणें गुरफटून असलेल्या माझ्या अंगावरून हात फिरवीत स्नेहार्द्र स्वरांत आचारीमामनें मला विचारलें, "बाब, तूं भिजला तर नाहींस ना?" त्यावेळीं, आपण भिजून चिंब झालेला असतांही माझ्या काळजी-पुढें स्वतःची परवा न करणाऱ्या, आपल्या स्थितीविषयीं उदासीन असणाऱ्या आचारीमामाबद्दल मला वाटलेली कृतज्ञता कशी व्यक्त करावी हें मला समजेना ! मी सद्गदित् होऊन आचारीमामकडे नुसता पहातच राहिलों.

卐

त्या रात्रीं अकस्मात् मी जागा झालों, माझ्या अंगांतून मस्तकां-तून सारखा घाम निथळत होता व माझीं गात्रें आस्ते आस्ते अत्यंत गलित, क्षीण होऊं पहात होतीं. अशा परिस्थितींत मी आतां जगूं शकत नाहीं असा मला भास होऊं लागला होता. मी क्षीणतेनें डोळे उघडून पाहिलें; समोरच भिंतीला लावलेलें मोठें घड्याळ, समईच्या मंद प्रकाशांत मला दिसलें; पण त्यावेळीं त्यांत किती वाजले होते तें मला दिसेना.

माझ्या अंथरुणाशेजारींच असलेल्या एका गादीला टेकून माझी आई बसल्या ठिकाणीं झोंपली होती, आणि तिच्या कुशींत देहाची गठडी करून माझी पत्नी पडली होती. नुसत्या जमिनीवर हाताची उशी करून पडल्या ठिकाणींच बिचारीला झोंप लागलेली असावी असें दिसत होतें. सतत एकवीस दिवसपर्यंत आलोचन जाग्रणें केलेलीं असल्यामुळें पहाटेच्या संधीस न कळत त्यांचा असा डोळा लागल्यास त्यांत आश्चर्य तें कसलें ? शिवाय अठ्ठाविसाव्या दिवसापूर्वी ताप उतरणार नाहीं, असें डॉक्टरनें अनुमान केलेलें असल्यानें, आज ताप उतरेल अशी शंकासुद्धां कुणाला नव्हती. पण डॉक्टरांचें अनुमान खोटें ठरविण्यासाठीं कीं काय आजच तापानें पळ काढायचें ठरविलें होतें.

पलिकडच्या कोपऱ्यांत मी हलकेंच नजर फिरविली. तिथें समई नेहमींप्रमाणें मंदपणें तेवत होती. जवळच दोन गडीमाणसें निद्राधीन होऊन कशीं तरी पडलीं होतीं. जिकडे तिकडे भयाण शांतता पसरली होती.

आणि अशा वेळीं समईच्या फिक्कट प्रकाशांत आमचा आचारीमाम मात्र कसलें तरी स्तोत्र मनांतल्या मनांत वाचीत बसला होता.

इकडे माझ्या आंगांतून घामाचे लोट एकासारखे वहात होते व मला तर, काय करावें हें सुचत नव्हतें.

समईजवळ वाचीत बसलेल्या आचारीमामाला हांक मारण्याइतकी किंवा जवळच झोंपलेल्या आईला वा पत्नीला उठवण्याइतकी ताकद मला नव्हती. एकवीस दिवसांच्या तापामुळें मला इतकी अशक्तता आली होती, कीं कपाळाचा घाम ओंठावरून वहात होता पण हात वर करून ओंठ पुसण्याचेंसुद्धां त्राण मला नव्हतें.

जवळच अविश्रांत परिश्रमानें क्लांत झालेली माझी माता व पत्नी उभयतां झोपलेलीं आहेत, समोरच आचारीमाम वाचीत बसलेला

आहे आणि हें मी उघड्या डोळ्यांनीं पहात असतांना इथें माझा प्राण जात आहे, एवढें सुद्धां अखेरच्या वेळीं शुद्धीवर असूनही सांगतां येऊं नये हें पाहून माझें हृदय पिळवटून निघूं लागलें; माझ्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा गळूं लागल्या.

शेवटीं, आचारीमामचें माझ्याकडे कसें तरी लक्ष वेधून घ्यावें म्हणून मोठ्या प्रयासानें सर्व शक्ति एकवटून मी किंचाळलों,

—अं ऽ ऽ अं ऽ ऽ हं आऽईऽग ऽ ऽ ऽ ! !

माझें तें क्षीण कण्हणें ऐकल्याबरोबर आचारीमामनें झट्कन् पुस्तक बाजूला टाकलें; तो लगबगीनें माझ्याजवळ आला आणि घाबऱ्या स्वरांत म्हणाला,

—बाब ! काय होतंय तुला ? काय पाहिजे ?

त्याच्या प्रश्नाला उत्तर देण्याचें मला त्राण नव्हतें; मी मूक वृत्तीनें त्याचा हात महत् प्रयासानें माझ्या हातांत धरला व माझ्या कपाळावर ठेवला.

त्याबरोबर आचारीमाम दचकून मोठ्यानें म्हणाला,

—घाम आला कीं तुला बाब !

इतकें तो बोलत आहे तोंच आई वगैरे मंडळी धडपडून जागी होऊन मजकडे येतांना मी पाहिली.

...आणि दुसऱ्या दिवशीं जेव्हां मला समजलें, कीं तो घाम येतां येतां टेंपरेचर अगदींच कमी झाल्यामुळें मी बेशुद्ध झालों होतों व शेवटीं डॉक्टरला आणून इंजक्शनें केल्यानंतर मोठ्या प्रयासानें मी शुद्धीवर आलों, तेव्हां आचारीमामविषयीं माझें अंतःकरण कृतज्ञतेनें कांठोकांठ भरून वाहूं लागलें.

---

आचारीमाम–सत्यकथा

व्यं. अ. पै रायकर.

# धर्माच्या नांवाखालीं !

आज यमाच्या दरबारांतील सारी सभा, पृथ्वीवर मरण पावलेल्या एका पुण्यवान साधूच्या जीवाची मोठ्या उत्सुकतेनें वाट पहात होती.

पृथ्वीवर मरण पावणाऱ्या मानवांच्या आत्म्यांना यमदूत यमाच्या दरबारांत बिनचूकपणें हजर करीत; मृतात्म्यांच्या पापपुण्यांच्या कृत्यांचा चित्रगुप्त पाढा वाची आणि यमराज त्यांच्या कृत्यांप्रमाणें त्यास स्वर्ग, नरक किंवा मोक्ष या जागीं नेण्याची आपल्या दूतांना आज्ञा करी.

पृथ्वीवरील ज्या प्राण्याला यमदूत आणायला गेले होते, तो सामान्यांपैकीं नसून एका पुण्यवान साधु पुरुषाचा आत्मा होता व म्हणून त्याच्या आगमनाला सारी यमसभा आज आतुर झाली होती.

इतक्यांत दीप्तिमान अंगाचे दोन यमदूत मोठ्या अदबीनें दरबारांत शिरले आणि त्याबरोबर त्यांच्या मध्यभागीं असलेली अंगुष्ठमात्र अशी तेजोमूर्ति विलक्षण प्रकाशानें तळपूं लागली.

दरबारचे मानकरी आणि त्यांच्यामागें उभे असलेले यमदूत यांनीं स्मितपूर्वक माना लववून नवीन आत्म्याचें स्वागत केलें आणि सर्वज्ञतेनें चमकणारे आपले नेत्र क्षणभर त्या तेजाच्या ज्योतीवर स्थिर करून, यमराजानें आपल्यासमोर मांडलेल्या त्या अमोल आसनावर स्थानापन्न होण्याची त्या आत्म्याला विनंति केली.

पारदर्शक नीळ आणि चकमकणारीं नक्षत्रें यांच्या सहाय्यानें घडविलेल्या त्या आसनावर ती विभूति स्थिर होतांच तिच्यांतून निघणाऱ्या प्रकाशकिरणांचें त्या आसनांतून परावर्तन होऊन अद्भूत रंगांचें जाळें तिच्याभोंवतीं निर्माण झालें.

तो आत्मा स्थानापन्न झालेला पाहातांच, यमराजाच्या उजव्या हातासमोर एका विशिष्ट आसनावर विराजमान झालेल्या चित्रगुप्तानें सुवर्णाच्या पानावर तेजाच्या शाईनें लिहिलेली आपली प्रकाशमान वही उघडली, समोरच्या सभेकडे नजर फिरविली आणि धीरगंभीर मुद्रेनें त्याच्या पुण्यकृत्यांचा पाढा वाचण्यास सुरवात केली.

चित्रगुप्त व यमराज यांच्या आसनापुढेंच सोन्याच्या दांडीचा, हिऱ्यांच्या पारड्यांचा आणि मोत्यांची झालर असलेला एक चकचकीत तराजू टांगलेला होता. त्याच्या एका पारड्यांत चित्रगुप्तानें उच्चारलेलीं त्या साधूचीं पुण्यकृत्यें तेजाच्या लोळाप्रमाणें जमा होत होतीं.

प्रत्येक पुण्यकृत्याच्या उल्लेखाबरोबर पारड्यांतील तेजोसंचय वाढत होता आणि त्याच्या तोलानें तराजूंतून सूक्ष्म ध्वनि निघून पारडें हळुहळू खालीं जात होतें.

याप्रमाणें चित्रगुप्तानें शेंकडों पुण्यकृत्यांचा उल्लेख केला. त्यामुळें पारड्यांतील पुण्यसंचय किती तरी मोठा झाला आणि पारडें अतिशय खालीं आलें.

सगळ्या पुण्यकृत्यांचा निर्देश करून होतांच पारडें स्थिर झालें. पुण्यसंचय इतका मोठा होता, कीं त्या आत्म्याला मोक्षपद मिळणार हें निश्चित झाल्यासारखें होतें, म्हणून सभेंतील सगळ्या प्रेक्षकांनीं टाळ्या वाजवून त्या विभूतीचा जयजयकार केला.

विभूतीचा चेहरा आनंदानें नी अभिमानानें अधिकच प्रफुल्ल झाला आणि मोक्षपदलाभाच्या जाणीवेचें समाधान तिच्या नेत्रांत चमकूं लागलें.

जयजयकाराचा आवाज त्या ठिकाणीं दुमदुमत असतांनाच चित्रगुप्त एकदम गंभीर स्वरांत म्हणाला,

—थांबा! याचं पापकृत्य सांगायचं अजून राहिलं आहे.

हें ऐकतांच सारी सभा तटस्थ झाली. त्या आत्म्याला मोक्षपदाला नेण्याच्या तयारीनें पुढें सरसावलेले यमदूत जागच्याजागीं थबकले. अचानक अशनिपात झाल्याप्रमाणें त्या आत्म्याची मुद्रा झाली.

चित्रगुप्तानें हलकेच दुसरें पान उलटलें व एकेक शब्द सावकाशपणें उच्चारीत तो उद्गारला,

—धर्माच्या नांवाखालीं व्यभिचार!

इतकें म्हटल्याबरोबर दुसऱ्या पारड्यांत अकस्मात अंधारापेक्षांही काळें अन् भीषण असें विरल द्रव्य दिसूं लागलें. थोड्याच वेळांत त्याचा आकार वाढत गेला व त्याच्या वजनानें क्षणार्धांत तें पारडें खालीं आदळलें. पुण्याचें पारडें हलकें होऊन वर तरंगूं लागलें.

—काय? व्यभिचार?—तो अंगुष्ठमात्र जीव भीतीनें चित्कारला.

—होय.—चित्रगुप्तानें शांतपणें म्हटलें.

—महाराज!—त्या विभूतीच्या तोंडून शब्द निघाले,—सगळं आयुष्य मी ईश्वराच्या सेवेंत वेंचलं. संसार सोडला व हजारों लोकांना परमेश्वरप्राप्तीचा मार्ग दाखविला. शारीरिकच काय,

पण मानसिक व्यभिचारही माझ्या हातून कधीं घडलेला नाहीं. महाराज, नोंद करतांना आपली चूक नाहीं ना झाली?

—नाहीं; माझी चूक झाली नाहीं. चित्रगुप्त कधींही चुकत नसतो.

—मग हें आश्चर्यच नाहीं का?—विभूति हताश स्वरांत म्हणाली.

—नाहीं. त्या पापसंचयाकडे लक्षपूर्वक पहा. तुझ्या नांवावर जमा झालेला व्यभिचार जसा घडला तसा तुला त्यांत पहातां येईल.

विभूतीनें त्या काळ्याकुट्ट ढिगावर आपली नजर स्थिर केली. सिनेमाच्या पडद्यावरून वेगवेगळे देखावे निघून जावे, त्याप्रमाणें त्या कृष्णसंचयांतून त्या विभूतीच्या आयुष्यांतील एका विशिष्ट प्रसंगाशीं निगडींत असलेलीं दृश्यें धांवूं लागलीं.



आज अच्युतानंद महाराजांचा वाढदिवस होता व त्या निमित्तानें महाराजांच्या शेकडों शिष्य–शिष्यणी 'नंदिबाग'च्या मठांत एकत्र जमल्या होत्या. सगळीकडे आनंद, उल्हास यांचें साम्राज्य पसरलें होतें.

गुरुमहाराजांच्या नांवानें पदोपदीं होत असलेला जयजयकार, टाळ, पखवाज, पेटी यांच्या संमिश्र साथींत शिष्य–शिष्यणींच्या सुरेल आवाजांत चाललेलें दिंडी भजन, पुरुष–स्त्री हा भेदभाव न बाळगतां ईश्वरप्राप्तीसाठीं झालेली त्यांची तन्मयता, हें सगळें पाहून उच्चासनावर विराजमान झालेल्या अच्युतानंद महाराजांच्या मुखावर एक प्रकारचा अनिर्वचनीय सात्विक अभिमान विलसत होता. त्यांची शुभ्र दाढी त्यांच्या गत चारित्र्याची साक्ष द्यायला पुरेशी होती. त्यांच्या विशाल नेत्रांत मातेचा प्रेमळपणा होता आणि पित्याची

क्षमाशीलता होती. त्यांच्या हंसतमुख चेहऱ्यावर भौतिक सुखाबद्दल अनास्था आणि आध्यात्मिक सुखाबद्दल ओढ दृग्गोचर होत होती.

महाराजांच्या भक्त मंडळींत प्रतिष्ठित, वजनदार व श्रीमंत लोक होते; थोरामोठ्यांच्या स्त्रिया, कुमारिका नी तरुण विधवाही होत्या.

त्यांच्या शिष्यवृंदाचा जमाव बराच मोठा होता, व त्यांतल्या एका शिष्यावर महाराजांची विशेष कृपा होती. अर्थात् पट्टशिष्य म्हणून साधूच्या खालोखाल सारा शिष्यवृंद त्याला मान देई. दिवाकर तीस पस्तीस वर्षाच तरुण ब्राम्हण होता. आपल्या कौशल्यामुळें व दिखाऊ वर्तनामुळें तो महाराजांच्या कृपेस पात्र झाला होता. तो पक्का व्यवहारी होता. त्याची रसवंती मधुर होती. संभाषणाची कला त्याला एवढी उत्तम साधली होती, कीं ऐकणाराच्या मनावर त्याच्या शब्दजालाची विलक्षण मोहिनी पडे. रामायण महाभारत इत्यादि धर्मग्रंथांतील अनुरूप प्रसंग व्यवहारांतील योग्य दाखले, ज्ञानेश्वरी, दासबोधासारख्या संतांच्या ग्रंथांतील अर्थपूर्ण ओळी, भगवद्गीतेंतील संस्कृत श्लोक, वगैरे गोष्टींचा कौशल्यानें उपयोग करून आपल्या कळकळीच्या आवाजांत डोळयांत अश्रू आणून ज्या वेळीं तो कीर्तन करूं लागे, त्या वेळीं धार्मिक श्रद्धाळू बाया रडून डोळे सुजवीत आणि मनांत म्हणत, " धन्य! धन्य आमचा दिवाकर महाराज!"

महाराजांबरोबर तो तास न् तास परमेश्वराच स्वरूप, मायाब्रह्माचा ब्रह्मघोटाळा इ. संबंधीं बोलत बसे. त्या वेळीं ब्रम्ह—माया प्रकृति—पुरुष, सरूपता—सायुज्यता, द्वैत—अद्वैत इत्यादि जाडे जाडे शब्द त्याच्या तोंडून निघालेले ऐकून त्यांच्या गुरुभगिनी दिवाकराकडे आदरानें पहात आणि मनांतल्या मनांत त्याच्या आध्यात्मिक तयारीचा हेवा करीत.

आजच्या समारंभांत तो प्रामुख्यानें वावरत होता. त्याची भिरभिरती सोत्कंठ नजर स्त्री—समाजावर वारंवार फिरत होती.

एका गोऱ्यापान, सुंदर अन् तरुण स्त्रीवर आज त्याचें लक्ष गेलें होतें.

पन्नाशी उलटलेल्या बिजवराची ती पत्नी होती. तिच्या वेष-भूषेंत भपका नव्हता. रुंद किनारीचें लुगडें व खणाची लांब बाह्यांची चोळी असा तिचा पोशाख होता. तिच्या चेहऱ्यावर तिचा कमालीचा साधा, सरळ स्वभाव प्रतिबिंबित झाला होता. नवऱ्याकडून आपल्या सांसारिक हरएक आवडी भागत नसल्यामुळें तिनें गुरुभक्तीचा आश्रय केला होता. मनानें दुबळी, वृत्तीनें साधीभोळी, घरची गरीबी, अशा स्थितींत असल्या उत्सवाच्या प्रसंगीं जे क्षण जात, तेवढेच तिला सुखाचे वाटत.

दिवाकराच्या धूर्त व कावेबाज दृष्टीस हें सावज साधभोळें असल्याचें केव्हांच कळून चुकलें होतें. तिच्या तारुण्याचा फायदा आपणास कशा रीतीनें घेतां येईल हें तो मनांत अजमावूं लागला.

इतक्यांत अच्युतानंद महाराजांच्या स्नानाची तयारी झाली. शिष्यिणींनीं सुगंधित ऊन पाणी उपसून तयार ठेवलें. भक्त-जनांच्या जयजयकारांत नी वाद्यांच्या कोलाहलांत स्वामीजी स्नानास बसले. दिवाकर महाराजांचें आंग धुवूं लागला व कांहीं शिष्यिणी त्यांच्या अंगावर तांब्यानें पाणी घालूं लागल्या.

थोड्या वेळानें महाराजांचें स्नान आटोपलें. ते उठून उभे राहिले. महाराजांस स्नानानंतर लावण्यास गंध पाहिजे होतें. ती कामगिरी दिवाकरानें त्या तरुण शिष्यिणीला सांगितली व हळूहळू तिच्याशीं बोलणें वाढविलें.

रमाबाईला वाटलें, गुरुमहाराजांच्या कृपेस आतां उशीर नाहीं. कारण इतक्या बायकांच्या. जमावांत, गंध उगाळन आणण्यास त्यांच्या पट्टशिष्यानें मलाच सांगितलें, आपुलकीच्या भावनेनें तो माझ्याशींच बोलत आहे, हा पट्टशिष्याचा मजवर अनुग्रहच नव्हे काय ?

समारंभ आटोपला. घरीं परततांना साऱ्या भाविक शिष्य-शिष्यिणींच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. ईश्वरप्राप्तीचें तें स्थान सोडून जातांना त्यांना कमालीचें दुःख झालें. आज अच्युतानंद महाराज आपल्या मुख्य निवासस्थानाकडे–बेळगांवास–रवाना होणार होते.

त्यांच्या भक्तगणानें बांधलेल्या ह्या नंदिबागच्या मठांत अच्युतानंद महाराज वर्षाकांठीं एकदोन खेपा येत व कांहीं दिवस प्रेमळ भक्तजनांच्या सहवासांत घालवून परत जात. ह्या खेपेस त्यांचा वाढदिवस होता व शिष्यांच्या प्रेमळ अत्याग्रहावरून ते वर्षचालीप्रमाणें आलेले होते.

समारंभ बहुतेक संपलाच होता. सगळेजण दुःखित अंतःकरणानें महाराजांचा निरोप व आशिर्वाद घेण्यास पुढें झाले. महाराजांना एकदम गहिंवरून आलें.

ते सर्वांना उद्देशून गहिंवरलेल्या आवाजांत म्हणाले,

—ईश्वराच्या ठिकाणीं पूर्ण विश्वास ठेवा. तो तुम्हांला कधींही अंतर देणार नाहीं. कसलीही बरी वाईट गोष्ट आचरणांत आणतांना ती ईश्वरार्पण करण्याची आपली तयारी असली म्हणजे तो जगचालक प्रभू तुमच्यापासून दूर नाहीं असं समजा.

'आज्ञा महाराज!' असें उत्तर देऊन भक्तगणानें महाराजांस नमस्कार केले. पट्टशिष्य दिवाकर यानेंही सर्वांचा निरोप घेतला. सर्वांनीं त्याला वंदन केलें.

दिवाकर रमाबाईजवळ येऊन म्हणाला,

—चाललांत माई?

—होय महाराज.—तिनें त्याला नमस्कार करीत पुढें म्हटलें,

—महाराज! एक विनंति आहे. तुम्ही आमच्याकडे कांहीं दिवसांसाठीं या केव्हां तरी! तुमच्या पुण्यवान् संगतीचा मला फार फायदा होईल.

—अवश्य येईन मी. तुम्ही आपल्या वर्तनानं आम्हाला चटका लावून जात आहां !

दोघही रडलीं आणि त्यांनीं परस्परांचा मोठ्या कष्टी अंतःकरणानें निरोप घेतला.



कांहीं दिवसांनंतर दिवाकर महाराज आपल्या आवडत्या गुरु भगिनीच्या संगतींत कांहीं दिवस घालविण्याच्या हेतूनें तिच्या कडे गेला.

दुपारची वेळ होती. बाहेर ऊन कसें अगदीं रखरखीत पडलें होतें. रमाबाईचा वृद्ध पती त्यावेळीं बाहेर ‘बल्कांवा’ वरच गुडगुडी ओढीत बसला होता, अन् मधून मधून खोंकत होता. अकस्मात् दिवाकर महाराजाला दारांत पहातांच त्यानें लगबगीनें गुडगुडी बाजूस टाकून त्याला अभिवादन केलें व अत्यंत आदरानें आंत नेऊन त्याला खोलींत बसवलें.

रमाबाई इतक्यांतच स्नान उरकून खोलींत येत होती. तिचा गौरवर्ण गोंडस देह, उन्नत वक्षोज, तिच्या भिजलेल्या पांढऱ्या वस्त्रांतून उठून दिसत होते. चालतांना पदाघाताबरोबर तिच्या पुष्ट अवयवांची होणारी मंद हालचाल, दिवाकराला अत्यंत आकर्षक वाटली. त्याची अभिलाषी, पिपासू नजर तिच्यावर स्थिर झाली.

अकस्मात् दिवाकर महाराजाला समोर पहातांच ती किती तरी दचकली, लाजली. तिनें लगबगीनें दुसरीकडे जाऊन लुगडें बदललें, कुंकू लावलें नी चोळी घालून ती गुरुबंधूच्या दर्शनास आली.

रमाबाईचा नवरा अतिशय भोळा होता. त्याची वृत्ती अगदीं धार्मिक नी ईश्वरभक्तिपरायण होती. अर्थात पत्नीचा स्वभाव त्याच्या आवडीप्रमाणें होता. व अशा स्वभावाची धार्मिक पत्नी लाभल्याबद्दल तो परमेश्वराचे मनांतल्या मनांत किती तरी आभार मानीत होता.

तिनें दिवाकराला नमस्कार केला. दोन्ही हातांनीं त्याचे पाय घट्ट धरून त्यांवर आपलें मस्तक टेकलें आणि सद्गदित होऊन म्हटलें,

—आपण क्षेम ना ?

—रमाबाई, तुमची भेट झाल्यानं फार आनंद झाला. गुरु-भक्तिणी का थोड्या आहेत ? पण परमेश्वरभक्तींत दिवसाचा बराच वेळ मनःपूर्वक वेंचणाऱ्या तुम्हीच नाहीं का ? अशांच्या संगतींत रहायाला मिळणं हें भाग्यच !

या शब्दांनीं रमाबाई खुलून गेली. दिवाकरमहाराजांच्या मुखां-तून असे उद्गार निघावे हा आपला मोठा गौरव होत आहे असें तिला वाटलें.

आज आपल्या घरांत अच्युतानंद महाराजांचा पट्टशिष्य आल्या-बद्दल तिचें मन अननुभूत आनंदानें न्हाऊन निघालें. दिवाकराची सेवा कशा रीतीनें केली असतां त्याची आपल्यावर विशेष कृपा होईल याचा ती मनाशीं विचार करूं लागली.

तिनें त्याच्याकरतां ताबडतोब ऊन पाणी उपसलें व त्याला स्नानास नेलें. स्नान आटोपून दिवाकर देवपूजेचें अनुष्ठान मांडून बसला आणि रमाबाई त्याच्या जेवणाच्या तयारीला लागली.

देवापुढें बराचसा कापूर व उदबत्त्या जाळून त्यानें एकदांची पूजा संपविली आणि रमाबाईला हांक मारून नैवेद्य व तीर्थ प्राशन करविलें. थोड्याच वेळांत गुरुबंधु दिवाकर जेवणास बसला. आग्रह करकरून तिनें त्याला बरींच पक्वान्नें खावविलीं. तिच्या मुद्रेवर समाधानाची छटा विलसूं लागली.

रात्र झाली. एका खोलींत आपल्या जुन्या पलंगावर रमाबाईनें दिवाकराची शय्या तयार केली. आपण गरीब असल्यामुळें गुरु-बंधूची सेवा आपल्या मनाप्रमाणें आपणांस करतां येत नाहीं याचें

रमाबाईला पराकाष्ठेचें वाईट वाटत होतें. तरी पण तिनें आपल्या शक्तीबाहेर त्याची सेवा चालविली होती.

दिवाकर पलंगावर पहुडला. रात्रीचें सर्व कामधाम आटोपून रमाबाई गुरुबंधूच्या सेवेस हजर झाली. तिनें त्याला मसालेदार दूध प्राशन करण्यास दिलें व विनम्र भावानें ती आपल्या जपाची माळ घेऊन खालीं बसली.

खोलीच्या कोपऱ्यांत एक समई मंदपणें तेवत होती; पण तिचा प्रकाश पलंगावर पडलेल्या दिवाकर महाराजावर पडत नव्हता.

—आज चालून आल्यामुळें पाय कसे अगदीं दुखत आहेत बुवा!—आपल्या तंगड्या खालींवर करीत दिवाकरानें म्हटलें.

—महाराज, आपली आज्ञा असेल तर मी आपले पाय चुरतें.

—नको! नको! कशाला उगीच तुमच्या नाजूक हातांना शीण द्या!

—महाराज! त्यांत मला मुळींच शीण वाटायचा नाहीं. उलट आनंदच होईल.—इतकें बोलून रमाबाई पलंगाच्या टोंकाला अदबीनें बसली व दिवाकराचे पाय आदरानें चुरूं लागली.

—महाराज! ईश्वरप्राप्तीचा सोपा मार्ग आपण मला सांगाल का?—पाय चुरतां चुरतां रमाबाईनें दिवाकराला हलकेच प्रश्न केला.

—रमाबाई, तुमची ईश्वराच्या ठिकाणीं जडलेली आसक्ति पाहून मला पराकाष्ठेचा आनंद होत आहे. ह्या मर्त्य, क्षणभंगुर, असार संसारांत ईश्वरभक्तीवांचून अन्य तरणोपाय नाहीं.

—आपण खरेच पुण्यवान् आहांत!—रमाबाई कौतुकमिश्रित आदरानें म्हणाली,—शेंकडों शिष्य असून महाराजांचा अनुग्रह आपल्यावर उगाच नाहीं झाला! महाराज, आपण आपली तयारी

कशी केली तें मला सांगाल का?—रमाबाईच्या प्रश्नांत ईश्वर-प्राप्तीबद्दलची तिची कळकळ दिसून येत होती.

—परमार्थांत विकार जिंकल्याशिवाय कांहींही होत नाहीं. सगळीं बरीं वाईट कर्मं करायचीं पण तीं आसक्तिरहित, परमेश्वरार्पण करून करायचीं! धर्मग्रंथांच्या वाचनाशिवाय आणि उपासनेशिवाय हें शक्य नाहीं.

दिवाकर जरी बोलत होता तरी त्याचें लक्ष रमाबाईच्या उन्मादक देहावर लागलें होतें. ती यावेळीं फिक्कट केशरी रंगाचें साधें पातळ नेसली होती. तिचें भरदार व उन्नत वक्षस्थळ, पांढऱ्या चोळींत न सामावल्यामुळें ओसंडूं पहात होतें आणि खिडकींतून पडलेल्या चांदण्याच्या कवडशांत तिचें सौंदर्य दिवाकर आपल्या पापी डोळ्यांत सांठवून घेत होता.

—पण महाराज, मग सर्वांनाच हें कां शक्य नाहीं होत? धर्मग्रंथांचं वाचन व उपासना या गोष्टी करूनही मन ताब्यांत येत नाहीं. असं होत नाहीं का?—रमाबाईनें गोंधळून जाऊन म्हटलें.

—त्याला पूर्वपुण्याची जोड लागते. वृत्तीची स्थिरता ही पूर्व-कर्मार्जित आहे. परंतु प्रयत्नांच्या सातत्यानं ती या जन्मींही मिळवितां येते. मन स्थिर आणि शुद्ध असलं म्हणजे हातून कोणतींही कर्मे घडलीं तरी तें निर्लेप रहातं. खुद्द भगवान् गीतेंत म्हणतात.

'निराशीर्यत चित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः ।
शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥'

रमाबाई, तुम्ही सतत ईश्वराच्या सेवेंत मग्न राहून तुमच्या हातून घडूं पहाणारीं बरीं वाईट कृत्यं, आसक्ति न बाळगतां खुशाल करून जा व तीं भगवान् श्रीकृष्णाला अर्पण करा.

यावेळीं रात्रीचे बारा वाजत आले होते. खोलींतील चांदणें कमी होत होतें. घराच्या मागें असलेल्या कुळागरांतील पाटाच्या

पाण्याची सळसळ, त्या शांत आसमंतांत स्पष्टपणें ऐकूं येत होती. समोरच्या बांधावरील नारळीच्या झाडांचे उंच उंच शेंडे चांदण्याच्या धवल प्रकाशांत शोभून दिसत होते. लांबवरपर्यंत दिसणारें हिरवें गर्द शेत व पलीकडचा डोंगर कितीतरी सुंदर दिसत होता; व हें मजेदार दृश्य पलंगावरून उभयतांना दिसत होतें.

बोलतां बोलतां दिवाकर अगदीं उल्लू बनला. त्यानें चटकन् उठून रमाबाईला जवळ ओढली व तिचें आवेगाच्या भरांत त्यानें चुंबन घेतलें.

एखाद्या ठिकाणीं हिरवें गार गवत पाहून एखाद्या मार्गस्थानें निर्धास्तपणें त्यावर पाय ठेवावा व अकस्मात् तो त्या दलदलीच्या भागावर कितीतरी खोल रुतून बसावा म्हणजे जशी त्या पांथस्थाची स्थिती होते, अगदीं तशीच रमाबाईची झाली.

ती एकदम चरकली. तिचें अंतःकरण धडधडूं लागलें. झट्कन् मागें सरकत ती म्हणाली,

— महाराज, हें काय वेड्यासारखं !

— अग, त्यांत तुला एवढं दचकायला काय झालं ? गुरु-महाराजांनीं त्या दिवशीं दिलेला संदेश तूं इतक्यांतच विसरलीस काय ? आसक्ति न धरतां केलेलं वाईट कृत्यसुद्धां ईश्वराला अर्पण केलं म्हणजे त्याचं पातक कधींही लागत नसतं! समजलीस वेडे !

इतकें बोलून, तिच्या प्रतिकाराची पर्वा न करतां त्या चांडाळानें तिला-त्या भोळ्याभाबड्या गुरुभगिनीला--एकदम आपल्या हृदयाशीं कवटाळून धरलें.

अष्टमीचें चांदणें खोलींतून निघून गेलें होतें. तेल संपल्यामुळें समईचा प्रकाश केव्हांच लुप्त झाला होता. रातकिड्यांचा कर्णकटु आवाज बाहेर जोरानें होत होता आणि बाहेरच्या ओटीवर झोंपलेल्या रमाबाईच्या नवऱ्याचें भेसूर घोरणें उभयतांना स्पष्टपणें ऐकूं येत होतें.



—पाहिलंस तूं हें दृश्य ?—चित्रगुप्त म्हणाला.

—होय महाराज !—अच्युतानंद महाराजांचा आत्मा नम्रतेनें म्हणाला.

—' राजा राष्ट्रकृतंपापं, राज्ञः पापं पुरोहितः '

भर्ताच स्त्रीकृतं पापं **शिष्यपापं गुरुस्तथः '**

अर्थात्, धर्माच्या नांवाखालीं घडलेल्या या व्यभिचाराचं पाप तुझ्या वांट्याला कसं आलं हें समजलं ना तुला आतां ? संशयनिरसन झालं ना ?—चित्रगुप्तानें प्रश्न केला.

अच्युतानंदाच्या त्या अंगुष्टमात्र जीवानें आपली मान पश्चात्तापानें खालीं घातली.



धर्माच्या नांवाखालीं—' कुळागर '

व्यं. अ. पै रायकर

# ईश्वराचें अस्तित्व ?

मे महिन्यांतील रात्रीची वेळ. नुकतेंच आमचें जेवण झालें होतें. बहुतेक सगळीकडे नीजानीज झाली होती. अशा वेळीं मी व फारा दिवसांनीं सुटींत आमच्याकडे आलेला माझा मावसबंधु अशोक माडीवरील बाहेरच्या उघड्या गच्चीवर एका दगडी राउंड टेबला-भोंवतीं खुर्च्यांवर बसून चांदण्यांत गप्पा मारीत होतों.

त्या दिवशीं आमच्या गप्पांना बराच रंग चढला. कारण शेजारच्या देऊबाबांचा मुक्काम आमच्याकडे होता. देऊबाबांचा स्वभावविशेष म्हणजे उतार वयाचे असले तरी त्या त्या वातावरणा-प्रमाणें ते लहानांत लहान व जाणत्यांत जाणते होत. आम्हां तरुण मंडळींत मिळून मिसळून वागणें किंवा आमच्या हास्यविनोदांत भाग घेणें त्यांना फार आवडे.

आमचे वादविवाद जोरांत चालले होते. बोलतां बोलतां सहज देवाच्या अस्तित्वावर बोलणें निघालें. देऊबाबांनीं देवाचें अस्तित्व सिद्ध करणाऱ्या पुराणांतील कांहीं गोष्टी अगदीं तल्लीन होऊन सांगितल्या. कितीतरी मुद्दे आमचीं तोंडें बंद करून टाकण्यासाठीं पुढें आणले. पण बिनतोड युक्तिवादानें व तर्कशास्त्राच्या आधारें

ते आम्ही पार हाणून पाडले. शेवटीं समारोपादाखल अशोकनें हंसत हंसत म्हटलें,

—देऊबाब, पाहिलंत ना देवाचं अस्तित्व सिद्ध करणारीं तुमचीं विधानं किती फोल आहेत तीं ? यापुढं तरी प्रगतिपथावरील हें देवाचं बुजगावणं समाजानं दूर सारलं पाहिजे. तुम्ही नुकत्याच सांगितलेल्या पुराणांतील अद्‌भुतरम्य कथांना व वर्णनांना आजच्या तरुण पिढीनं 'अरेबियन नाइट्स' मधील गोष्टींपलीकडे जास्त किंमत देतां कामा नये. प्रत्येकानं स्वतःच्या बुद्धीनं विचार करायला शिकलं पाहिजे.

यावर देऊबाबला कोणतेंच समर्पक उत्तर सुचेना. वादांत ते आज सपशेल चीत झाले होते. मिशांतल्या मिशांत त्यानीं हास्य केलें; जवळच असलेल्या चंचींतून एक सुपारी काढली आणि आडकित्त्यानें ती ते बारीक करूं लागले. थोड्या वेळानें त्यांनीं हंसून म्हटलें,

—बाबांनो, मला कांहीं तुमच्या या म्हणण्याला उत्तर देतां येत नाहीं. कारण मी तुमच्याइतका शिकलेला कुठं आहे ? 'लिसेव'ची पायरी तर जन्मांत कधीं चढलों नाहीं. तथापि एवढं खरं, कीं तुमचं हें म्हणणं मात्र मला नाहीं बुवा पटत !

—तसं नव्हे तें देऊबाब ! आमचीं बोलणीं पटत नाहींत तीं तुमच्या भावनेला; पण बुद्धीला पटायलाच पाहिजे.—मी हंसून म्हटलें.

यावर आमच्यांत हंशाची एकच लाट येऊन गेली. इतक्यांत जवळच्या माडींतून 'देऊ शैण' अशी धीरगंभीर आवाजांत आजोबांनीं मारलेली हांक ऐकूं आली.

ती ऐकून आम्हीं चांगलेच चपापलों. आमचीं सगळीं बोलणीं आजोबांनीं ऐकलीं असलीं पाहिजेत या जाणीवेनें आम्हांला अगदीं

शरमल्यासारखें झालें. ते यावेळीं माडीवर असतील अशी आमची कल्पनाही नव्हती. आपल्या खालच्या खोलींत ते झोंपले असावेत असाच आमचा समज होता.

आजोबांची हांक कानीं पडतांच देऊ शणैनें गडबडीनें आपली चंची गुंडाळून घेतली, सुटलेलें उपरणें पुन्हां कंबरेला बांधलें आणि ते आतां त्यांच्याकडे जायला निघणार इतक्यांत खुद्द आजोबाच आम्ही बसलों होतों त्या ठिकाणीं आले.

त्यांना पहातांच आम्ही झट्कन् खुर्च्यांवरून उठलों आणि तेथून बाहेर जाऊं लागलों. तें पाहून आजोबा म्हणाले,

—बसा कीं रे तुम्ही! तुमच्याशींच बोलण्यासाठीं मी इथं आलों आहे.

आजोबांच्या वयाला सत्तर वर्षें झालीं होतीं. तरी त्यांची प्रकृति त्या मानानें निकोप होती. त्यांच्या वृत्तींत कणखरपणा होता. त्या भल्या मोठ्या पल्लेदार सफेत मिशा त्यांच्या रुबाबदार चेहऱ्याला शोभून दिसत होत्या. यावेळीं एक जाडसें छोटें धोतर ते नेसले होते. त्यांच्या उघड्या रुंद छातीवरील जानव्यांचा जुडगा, त्यांच्या कर्मठपणाची साक्ष देत होता.

जरा थांबून आजोबा पुढें म्हणाले,

—नुकताच झालेला तुमचा वादविवाद, माडींत आराम-खुर्चीवर बसल्या ठिकाणीं मी इत्थंभूत ऐकला. तो ऐकून त्यावर प्रकाश पाडणारें एक प्रत्यक्ष उदाहरण माझ्या डोळ्यासमोर उभं राहिलं.—इतकें बोलून त्यांनीं आपली प्रशांत, स्निग्ध नजर किंचित् काल समोरच्या अंतराळांत कुठें तरी निश्चित केली आणि नंतर आमच्याकडे वळून ते म्हणाले,

—फार वर्षांपूर्वींची, गेल्या तीस चाळीस वर्षांपूर्वींची, मी स्वतः प्रत्यक्ष पाहिलेली व आतां अंतःचक्षूंपुढें उभी असलेली ती रोमांच-

कारी गोष्ट मला तुम्हांला सांगावीशी वाटते. ती तुम्ही ऐका आणि देव आहे कीं नाहीं तें मग तुम्हीच ठरवा.—असें म्हणून जवळ-च्या एका खुर्चीवर ते बसले.

आजोबांच्या वाणींत एक प्रकारचा गोडवा होता; व गोष्टी सांगण्याची त्यांची शैली फार मोहक नी अवर्णनीय होती. लहान-पणीं त्यांच्या गोष्टी आम्हांला प्रत्यहीं ऐकायला मिळत असत. पण आतां तशी संधी आम्हांला क्वचितच मिळे. कधीं कधीं रंगांत येऊन एखादी गोष्ट ते सांगूं लागले म्हणजे चांगले सुशिक्षित, विद्वान् लोकही त्यांच्या परिणामकारी नीं मोहक वक्तृत्वांत अगदीं रंगून जात. तेव्हां आज कित्येक वर्षांनीं हा पर्वणीचा योग सहजा-सहजीं आलेला पाहून आम्हांला अर्थातच आनंद झाला. हर्षभरित अंतःकरणानें आम्ही आजोबा बसलेल्या खुर्चीजवळ जमिनीवर बसलों.

यावेळीं रात्रीचे अकरा वाजून गेले होते. बागतील रातराणीच्या मत्त सुगंधानें आजुबाजूचें वातावरण दरवळून गेलें होतें. गच्चीवर ठेवलेल्या सिमेंटच्या मोठमोठ्या कुंडींतील गुलाबाच्या टवटवीत झाडांना निरनिराळ्या रंगांचीं रसरशीत फुलें मोठ्या डौलानें लटकत होतीं आणि चांदण्याच्या सौम्य प्रकाशानें त्यांना वेगळीच शोभा आली होती. वाऱ्याच्या झोतानें घराजवळच्या अजस्र पिंपळाचीं पानें जोरानें सळसळत होतीं. दूरच्या देवळांत चाललेलें भजन रात्रीच्या प्रशांत समयीं ऐकायला गोड वाटत होतें. चंद्राच्या शुभ्र प्रकाशांत आसमंत नुसता न्हाऊन निघाला होता. आणि त्या प्रकाशांत दृष्टोत्पत्तीस येणारा देखावा किती तरी रम्य, मनोरम अन् सुंदर दिसत होता.

आजोबांनीं जरा खांकरून घसा साफ केला आणि ते सांगूं लागले,

—तो दिवस माझ्या आठवणींतून विसरला जाणं कधींही शक्य नाहीं. आश्विन महिन्यांतील नवरात्रं सुरू झालीं होतीं. पंचमीचं

आमच्या ' देवकार्या 'चं जेवण आटोपून वर्षचालीप्रमाणं शिरोड्यास जाण्यास आम्ही निघालों होतों. त्या काळीं प्रवास करणं आजच्याइतकं सुलभ नव्हतं. अशीं वाहतुकीचीं निरनिराळीं साधनंही पण त्यावेळीं नव्हतीं. वेऱ्याहून होडींतून शिरोड्याला जाणं म्हणजे चोवीस तासापेक्षांही जास्त अवधीचा प्रवास! सबंध रात्र होडींत काढायची; दुसऱ्या दिवशीं दुपारीं नदीकिनाऱ्यावर कुठल्या तरी गांवांत तांदळाचे गोटे उकडून धांवपळीनं कसे तरी दोन घांस खायचे व मग पुन्हां होडी सोडायची; ती तिन्हीसांजा झाल्यानंतर शिरोडेच्या बंदरांत पोंचायची! पाणी चांगलं मिळालं, मध्यंतरीं जेवण न घेतां एकदमच निघालों, तर दुपारीं एक दीड वाजण्याच्या सुमारास होडी मुक्कामाला पोंचायची! पण इतक्यांतच कुठं संपतें म्हणा! त्यानंतर अर्धा कोस लांबीचा रस्ता उन्हाच्या प्रखर तापांतून भुकेलेल्या स्थितींत बायकामुलांसह पायांनीं तुडवून तळमळत, होरपळत एकदांचा भिऱ्हाडीं जीव आणून घालायचा! त्या प्रवासामुळं जीवास इतका त्रास होई, कीं फिरून ताजातवाना होईपर्यंत निदान चार पांच दिवस तरी लागायचे. या मुलांना तितका नसला तरी तुम्हांला बऱ्याच वेळां याचा अनुभव आलाच असेल; नाहीं का देऊ शणै ?

—आहे बाबा माहित! सुदैव यांचं म्हणून ते त्रास भोगण्याचं आतां यांच्या वांट्यास राहिलेलं नाहीं.

यावर आम्ही आपसांत हलकेच हंसलों. आजोबा पुन्हां बोलूं लागले,

—बरोबर संध्याकाळीं चार वाजतां, पाणी साधून आम्ही त्या दिवशीं होडीवर चढलों होतों. होडींत घरची मंडळी म्हणजे वैकुंठ, गजानन (आजोबांचे धाकटे बंधु), आमची म्हातारी आई, दोघी धाकट्या भावजया, आणि वडील बहीण आक्का; तसंच तिचे दोघे लहान मुलगे व एक मुलगी, एवढी मंडळी होती.

त्यावेळीं माझं वय तिशीच्या आंतच होतं व वडील वारल्यामुळं घरचा सर्व कर्तेपणा त्यावेळीं माझ्याकडे होता.

—होडी चालू झाली. पाणी छान, व त्यांत वारा अनुकूल यामुळं झरझर बंदरं मागं टाकीत होडी जात होती.

—रात्र झाली. काळोख पडला. तेव्हां कंदील पेटवून तो होडीच्या 'तोल्दा'*ला आंतून दोरी बांधून लोंबकळविला आणि सगळेजण गप्पा गोष्टी हास्यविनोद करूं लागले.

—थोड्या वेळानं आईनं सर्वांना कॉफी दिली, (त्याकाळीं कॉफी म्हणजे एक अमृततुल्य पेय समजलें जाई) कालवलेले गोड पोहे वांटून दिले आणि दोन दोन पिकीं केळीं दिलीं. रात्रीचं जेवण नसल्याकारणानं हें फराळाचं सामान घरून आणावं लागे.

—सर्वांनीं अगदीं हंसत बोलत फराळ केला व अंमळशानं झोंपायची तयारी केली.

—बायका मंडळी 'तोल्दा'खालीं झोंपली व आम्ही पुरुषांनीं होडीच्या वरच्या 'साट्यां'वर अंथरुणं पसरलीं.

—रात्रीच्या प्रशांत समयीं, ज्योत्स्नेच्या शांत प्रकाशांत नदी-कांठचें व आसपासचें निसर्गसौंदर्य, चालत्या होडींत निजल्या ठिकाणीं पहात रहाण्यांत किती काव्य आहे, हें सांगून कळायचं नाहीं. त्याची गोडी अनुभवानंच चाखायला पाहिजे.

—फराळ करून आम्ही अंथरुणांवर लवंडलों. 'तोल्दा'ला लोंबकळत असलेल्या दिव्याची वात बरीच खालीं सरकविली. होडीवाल्यांनीं 'फुगांवा'+वर शिजविलेलं आपलं जेवण जेऊन आणि ताजेतवाने होऊन ते पुन्हां वल्हीं मारण्यास बसले.

—त्यावेळीं आकाशांत चंद्र नसला तरी नक्षत्रांच्या अंधुक व विरल प्रकाशांतही आजुबाजूचा देखावा स्पष्टपणें दृग्गोचर होत होता.

---

*तोल्द=ऊन किंवा पाऊस लागूं नये म्हणून होडीच्या अर्ध्या भागावर माडाच्या झांवळयांनीं बांधलेलें छप्पर. + फुगांव = मातीची शेगडी

—होडी नदीच्या एका तीराजवळून जात होती. चार पांच वल्हीं एका तालांत पडत होतीं आणि त्या तालावर होडीवाले आपलीं कोंकणी गाणीं अगदीं रंगांत येऊन म्हणत होते. पण त्या जागीमुळं रात्रीच्या वेळीं इफळींच्या झाडाझुडुपांत पंखांत चोंच खुपसून स्वस्थ विश्रांति घेत बसलेल्या पांढऱ्या शुभ्र बगळयांचे थवेच्या थवे दचकून उठत, पंखांची जोरानें फडफड करीत आणि पुन्हां त्याच झाडांवर कुठं तरी बसत.

—ही मौज पहात असतां व होडीवाल्यांचीं कोंकणी गाणीं ऐकतां ऐकतां आम्हांला केव्हां झोंप लागली तें कळलंसुद्धां नाहीं.

—त्यानंतर बऱ्याच वेळानं अकस्मात् कसल्याशा आवाजानं मी दचकून जागा झालों. पहातों तों काळ्याकुट्ट ढगांनीं आकाश अगदीं भरून गेलं होतं; पाऊस पडायला सुरवात झाली होती व मुलू होडीवाला मला म्हणत होता,

—" धनियानुं, जरा भीतर वचा ( आंत जा ) तुमीं. पावस खूपच येता ! "

—इतक्या अवधींत माझ्या शेजारीं झोंपलेले गजानन व वैकुंठ अंथरुणावरून धडपडत उठून बसले. घाईघाईनं आम्ही तेथून उठलों व आंत तोल्दामध्यें शिरलों.

—होडी त्यावेळीं मडकई बंदराच्या आसपास होती. तिथं नदी समुद्राच्या फांट्यास मिळत असल्याकारणानं त्या जागीं लाटा नेह-मींच जोराच्या असत. तशांत सोसाट्याचा वारा व वळवाचा मुसळधार पाऊस पडत असल्याकारणानं लाटांनीं त्या दिवशीं रौद्र स्वरूप धारण केलं होतं.

—हळुहळू पावसाचं प्रमाण फार वाढूं लागलं. वाऱ्याच्या प्रचंड झोतामुळं होडी पुढं जाणं तर बाजूलाच राहून ती कशी तरी हेलकावे खाऊं लागली. आणि होडीवाला म्लान मुद्रेनं अन् भीति-ग्रस्त अंतःकरणानं कुठं तरी जवळच्या किनाऱ्यावर होडी नेण्या-

बद्दल प्रयत्नाची पराकाष्ठा करूं लागले. पण नदीचं पात्र त्या ठिकाणीं बरंच विस्तृत होतं व पावसाच्या मुसळधार माऱ्यामुळं लगतचा किनाराही पण दृष्टिपथांत येत नव्हता. अशा स्थितींत होडीवाले बिचारे काय करणार ? होडी किनाऱ्यापासून अधिकाधिक दूर जाऊं लागली.

—होडींतल्या साऱ्या मंडळींत एकच आकांत उडाला. होडी घटकेंत एका बाजूला तर क्षणांत दुसऱ्या बाजूला कलंडे. मधूनच चेंडूसारखी वर उडे तर एकदम खालीं जाई. तें पाहून बायकामंडळी तर ढसढसां रडायलाच लागली. आणि त्यांना तसं रडतांना पाहून मुलांनींही त्यांतच आपला सूर मिळविला.

—पण बायकांची गोष्ट कशाला ? मी एवढा धीराचा ना ? पण त्या भयंकर प्रसंगीं मीदेखील घाबरलों. माझंदेखील अवसान गळालं. माझ्या जीविताची विशेष मातब्बरी नाहीं वाटली मला ! पण माझ्या एवढ्या कुटुंबांतील मायेच्या साऱ्या मंडळीला, बायकामुलांना थोड्याच वेळांत एकदम जलसमाधि मिळणार, आणि तें मरतां मरतां मला पहावं लागणार या भीषण कटु जाणीवेनं माझं हृदय शतशः विदीर्ण होऊं लागलं. डोळयांतून अश्रू वाहूं लागले.

—इतक्यांत आक्कानं " दादा, आतां कसं रे होणार आमचं ! " असा हृदयभेदक हंबरडा फोडला.

—तो ऐकून तर एकदम सगळीकडे रडारड जोरांत होऊं लागली. गजानन, वैकुंठ पुरुषासारखे पुरुष ! पण ते एकमेकाला मिठ्या मारून रडूं लागले. आक्कानं व आईनं चालविलेला विलाप तर माझ्या काळजाचं पाणी पाणी करीत होता. तरी पण उसन्या अवसानानं मी त्यांना धीर देऊं लागलों.

—असं रे काय करतां तुम्ही ! जाईल हा पाऊस; थांबेल हें वादळ ! त्यांत एवढं रडायला काय झालं ?

—पण माझं हें म्हणणं कोणालाही पटेना. आणि पटावं तरी कसं ? पावसानं अधिकच रौद्रस्वरूप धारण केलं होतं. मेघांचा गडगडाट कानठाळ्या बसवीत होता. मधुन मधून विजा चमकतच होत्या. होडींत पाणीच पाणी झालं होतं व होडी पूर्वीपेक्षांही जास्त हेलकावे खात होती.

—थोड्याच वेळानं होडीवालेही निराश झाले. अगदीं रडकुंडीस येऊन आंत तोल्दामध्यें आमच्या शेजारीं माना खालीं घालून बसले व मनगटांनीं डोळे पुशीत म्हणाले,

—"धनियानुं, आतां आमच्या हातीं कांयच उरलं नाय! आतां देवतेन राखूंचे आमकां!"

—आणि त्यांचें हें बोलणें ऐकल्यावर तर रडारड अधिकच जोरांत सुरू झाली. "देवते पाव," "कामाक्षे धांव" असा सर्वांनीं हृदयभेदक स्वरांत आक्रोश चालविला. तो ऐकून माझ्या अंतःकरणानं ठाव सोडला. मीही त्यांच्याबरोबर हुंदके देऊं लागलों.

—पाऊस तसाच जोरांत पडत होता. विजा चमकत होत्या. होडी भयंकर हेलकावे खात होती. व वारंवार उपसून टाकीत असतांही होडींत पाणी तुंबत होतें.

—इतक्यांत जवळच्या तीरावरून मोठ्यानं ओरडत कुणीसं म्हटलं,

—"धीर धरा; भिऊं नका. हा मी आलोंच."

—एखाद्या आकाशवाणीप्रमाणं झालेल्या त्या शब्दांनीं असहाय्य, अगतिक बनलेल्या आम्हां सर्वांना एक प्रकारचा विलक्षण धीर वाटला. रडारड थांबली. आशातुर व आनंदित मुद्रेनं आम्ही इकडे तिकडे पाहूं लागलों.

—पण पावसाच्या प्रचंड माऱ्यामुळं किनारा स्पष्टपणें दिसेना. एक दोन मिनिटांतच होडीच्या सुकाणूंला धरून एक इसम वर चढला आणि 'तोल्दा'वरून चालत आमच्याकडे येतां येतां म्हणाला,

—" कुठं रे गेले हे होडीवाले ? सरा रे बाहेर. आंतमध्यें दडून काय बसलांत ? या बसा वल्हीं घेऊन. मी सुकाणूं धरतों. मग पाहूं या होडी कशी बुडते ती ! "—असें म्हणत तो तोल्दावरून खालीं उतरला व आमच्या जवळ आला.

—तो एक धिप्पाड, काळाकभिन्न पुरुष होता. त्याचा चेहरा उग्र दिसत होता आणि पल्लेदार मोठमोठ्या मिशांनीं त्याला अधिकच उग्रता आली होती. त्याच्या कानांत भलीं मोठीं कुडीं व कंबरेंत रुपेरी 'कांड'* होतें. डोक्याला तांबडा रुमाल गुंडाळलेला होता व लंगोटीहि तसल्याच रुमालाची होती. शिवाय डोळ्यांत चटकन् भरण्यासारखी गोष्ट म्हणजे त्याचं सर्वांग तेलानं बरबटलेलं होतं.

—त्याला पहातांच होडीवाले चटकन् उठून उभे राहिले. त्याच्या शब्दजालाची सर्वांवर विलक्षण मोहिनी पडली होती. अचानक देवदूताप्रमाणें तो आमच्या होडींत कसा आला याचा विचार करण्याइतक्या मनःस्थितींत त्यावेळीं कोणीच नव्हता.

—त्या धिप्पाड इसमानं प्रथम होडींतील सर्व पाणी होडीवाल्यांच्याकडून उपसून घेतलं. नंतर त्यांना वल्हीं देऊन बसविलं आणि स्वतः आपण सुकाणूं हातांत धरून विशिष्ट रोखानं होडी चालू केली.

—आणि थोड्याच वेळांत त्यानं ती होडी समुद्राच्या फाट्यांतून सुरक्षितपणें काढली व खाडीच्या तीराजवळ आणून सोडली.

—इतक्या अवधींत पावसाचा जोर अजिबात थांबला. आकाश स्वच्छ होऊं लागलें. चांदण्या फिरून लुकलुकूं लागल्या. होडी नदीच्या एका कडेनं संथपणें चालूं लागली. एवंच, सर्व वातावरण ट्रान्स्फर सीनप्रमाणं पार बदलून गेलं.

—सर्वांना एकदम हायसं वाटलं. अगदीं आनंदी आनंद झाला. त्यावेळीं आम्हांस झालेल्या आनंदाचं वर्णन करणं शब्दातीत आहे.

---

* कांड = कंबरेंत घालायचा रुप्याचा करगोटा.

त्याची नुसती कल्पनाच केलेली बरी! त्या अपरिचित कुळवाड्याचे आभार कसे मानावेत, त्याच्या उपकारांची फेड कशी करावी तेंच मला समजेना. त्याच्याबद्दल वाटणाऱ्या कृतज्ञतेनं माझं अंतःकरण कांठोकांठ भरून गेलं. मी हळूच खिशांतून पाकीट काढलं आणि त्याला देण्यासाठीं हाताला मिळालेल्या दहादहांच्या पांच नोटा काढून मी आमच्या होडीवाल्यास हांक मारली व हलक्या आवाजांत म्हटलें,

—“ अरे मुळू, त्या इसमाला इथं बोलाव पाहूं ! ”

मुळू तोल्दांतून बाहेर निघाला व सुकाणूं धरून बसलेल्या त्या इसमाला हांक मारण्याकरतां त्यानें आपली नजर तिकडे वळविली.

—पण तिथं कुणीच नव्हतं. मुळूला आश्चर्य वाटून तो ‘तोल्दा’-वर चढला व सुकाणूं धरून बसतात त्या जागेकडे अगदीं डोळे फाडफाडून त्यानं पाहिलं. पण तिथं त्याला कुणीच दिसेना. मुळू एकदम स्तंभितच झाला. हलक्या पावलांनीं पुन्हां ‘तोल्दां’त येऊन तो आमच्या शेजारीं मट्कन् खालीं बसला, व आश्चर्याच्या, किंचित् भेदरलेल्या स्वरांत तो आजुबाजूला पहात हलकेच म्हणाला,

—“ धनियानुं, तो नांयच मंगा खंय; आतांच आशिल्लो हांगांच ! हें असें कसें जावचें ! ( मालकसाहेब, तो कुठंच दिसत नाहीं. आतांच तर इकडे होता ! हें असं कसं व्हावं ? ) ”

—त्याचं तें बोलणं ऐकून आम्ही जागच्या जागीं खिळल्या-सारखेच झालों. होडींत सगळीकडे आम्ही पाहिलं, पण तो इसम कुठंच दिसत नव्हता.

—होडी संथ जात होती. आकाशांत नक्षत्रं नव्या दिमाखानं चमकत होतीं. चंद्रोदय नुकताच झाला होता आणि त्या प्रकाशानं नदीचा पृष्ठभाग आणि पावसानं न्हाऊन टवटवीत झालेलीं किनाऱ्या-वरील झाडं झुडपं किती तरी सुंदर दिसत होतीं.

—बराच वेळ आमच्यांत निःशब्द शांतता पसरली. सर्वांच्या अंतःकरणांत आश्चर्य, भीति, आनंद इत्यादि निरनिराळ्या भावनांचा गोंधळ उडून गेला होता.

—इतक्यांत जरा दबकत मुलूनें म्हटलें,

—" धनियानुं, तो देवचार तर नांय ! "

—एकदम माझं अंतःकरण एका विशिष्ट आशंकेनं फुलून गेलं. मी अर्धवट स्वतःशीं, अर्धवट इतरांना उद्देशून किंचित् गहिंवरून म्हणालों,

—" नाहीं. तो देवचार नव्हे. तो आमच्या कुलदेवी कामाक्षीचा दूत होता. श्रीकालभैरव होता तो ! त्याचं तेलानं लिडबिडलेलं अंग तुम्ही नाहीं का पाहिलं ?

—आम्ही सर्वांनीं मग सद्गदित अंतःकरणानं भक्तिपूर्वक हात जोडून अंतराळांत कुठं तरी नमस्कार केले.

—आणि त्या वर्षापासून दर वर्षीं दसऱ्यास बिऱ्हाड निघण्या-पूर्वीं पंचमीच्या देवकार्याच्या वेळीं आम्ही श्रीकालभैरवाच्या नांवानं पान वाढतों व एका शूद्राला जेववीत असतों.

—झालं. संपली माझी गोष्ट. आतां चालूं द्या तुमचा वादविवाद. व ठरूं द्या देव आहे कीं नाहीं तें...

इतकें बोलून आजोबा खुर्चीवरून उठले व खालीं जाऊं लागले. तेव्हां त्यांच्या पाठमोऱ्या उंच आकृतीकडे आम्ही निराळयाच दृष्टीनें पाहूं लागलों. त्या दृष्टींत आमचा नास्तिकवाद लुप्त झालेला कुणालाही दिसला असता.

---

ईश्वराचें अस्तित्व !—अप्रकाशित

व्यं. अ. पै रायकर

# तुटलेले तारे

अनंत काणेकर यांचा लघुनिबंध–संग्रह. किं. १ रु.

**ज्ञानप्रकाश**—...दृष्टीची एकाग्रता, विचारांची व्यापकता व भाषेचा बोंचकपणा काणेकरांच्याजवळ आहे, म्हणूनच त्यांचे लघुनिबंध सरस असतात.......' तुटलेले तारे ' म्हणजे त्यांच्या धांवत्या विचारांची त्रुटित परंतु पाणीदार मालिकाच होय...हे तारे तोडलेले नाहींत. तुटलेल्या ताऱ्यांप्रमाणें त्यांची प्रभा तेजःपुंज आहे.—

**समाजस्वास्थ्य ( शकुंतला परांजपे )**—...प्रत्येक निबंधाची मांडणी फार मार्मिक असून भाषा अतिशय मनोहर आहे. जगाकडे व स्वतःकडे उघड्या डोळयांनीं आणि स्वतंत्र वृत्तीनें बघण्याची लेखकाची दृष्टि नवीन असून वाखाणण्यासारखी आहे...हा निबंधसंग्रह इतक्या उच्च प्रतीचा आहे कीं...हा प्रत्येकानें वाचावा व संग्रहीं ठेवावा, कारण तो एकदां वाचून समाधान होत नाहीं.

**विविधवृत्त**—...आशावाद हा काणेकरांच्या निबंधांचा आत्माच वाटतो, व त्यामुळें ' तुटलेले तारे ' वाचून शेवटीं मन उत्साही व प्रसन्न होतें...विचारांचा सरळपणा व भाषेचा साधेपणा हें काणेकरांच्या सर्वच निबंधांचें वैशिष्ट्य आहे.

**लोकमान्य**—...मराठी वाङ्मयांत काणेकरांनीं गणूकाकांचें नांव अजरामर केलें आहे...सर्व निबंधांत काणेकरांनीं आपलें स्वतःचें तत्त्वज्ञान ओतलें आहे. म्हणूनच हा लघुनिबंधसंग्रह वाचनीय आहे.

**चित्रा ( रा. भि. जोशी )**—...या सुटसुटीत आटोपसर, सरळ रचनेमुळें कोणताही निबंध वाचतांना कंटाळा येत नाहीं, आणि कोणताही निबंध वाचला तरी कांहींतरी नवीन कळतें

**महाराष्ट्र साहित्य–परिषदे** तर्फे झालेल्या चर्चेचा सारांश— ...या वाङ्मयप्रकारांत काणेकरांचा हातखंडा आहे, 'तुटलेले तारे' या पुस्तकांत त्यांचें सूक्ष्म निरीक्षण, बहुश्रुतता, आशावाद व समाजमनस्कता, इ. गोष्टी पदोपदीं प्रतीत होतात.